# तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

अरुंधती खंडकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : एप्रिल २००३
महाराष्ट्राचे शिल्पकार : क्र. १३

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०० ०१४



मुद्रक :
प्रमोद भोगटे,
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-ए, शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१,
धनराज मिल आवार, सीताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-१३. (दूरध्वनी : २४९४५६१५)

मुखपृष्ठ : राजा बडसल

किंमत : रु. ४०/-

# निवेदन

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, आर्थिक व वैचारिक जडणघडणीत ज्या दिवंगत महनीय व्यक्तींचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे अशा व्यक्तींची साधारणत: शंभर ते सव्वाशे पानांची सुबोध मराठी भाषेत चरित्रे लिहून ती ''महाराष्ट्राचे शिल्पकार'' या योजनेअंतर्गत पुस्तकरूपाने प्रकाशित करण्याची मंडळाने योजना आखली असून या चरित्रग्रंथमालेतील ''तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी'' हा तेरावा चरित्रग्रंथ आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या ''महाराष्ट्राचे शिल्पकार'' या योजनेअंतर्गत प्रकाशित होत असलेल्या चरित्रग्रंथमालिकेत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा चरित्रग्रंथ प्रकाशित करण्यात मंडळाला विशेष आनंद होत आहे. या आनंदाचे कारण उघड आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे पहिले अध्यक्ष. त्यांनी साहित्य आणि संस्कृती मंडळाचा पाया इतका आणि असा मजबूत घातला की नंतरच्या अध्यक्षांना या पायावर मंडळाची इमारत उभी करीत राहणे फारसे अवघड गेले नाही. ''तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी मंडळाच्या ज्या अध्यक्षपदाच्या खुर्चीवर विराजमान झाले होते त्या खुर्चीवर मी सध्या काम करीत आहे'' असे नंतरच्या अध्यक्षांना अभिमानाने सांगता आले, एवढे मोठे योगदान तर्कतीर्थांनी मंडळाला दिलेले आहे.

या चरित्रग्रंथाच्या लेखिका डॉ. अरुंधती खंडकर या तर्कतीर्थांच्या कन्या. एरवी निकटच्या नात्यातल्या एखाद्या व्यक्तीकडे चरित्रग्रंथाचे लेखन सोपविले की काही चरित्रबाह्य गोष्टींचा समावेश त्या ग्रंथात होत असतो. चरित्रनायकाशी आपलं काय नातं आहे, हे नातं किती जवळचं आहे, चरित्रनायकाच्या मोठेपणात आपलं किती आणि कसे योगदान आहे, आदी बाबी ठिगळ लावल्याप्रमाणे त्या चरित्रग्रंथात येतात. पण या चरित्रग्रंथात तसं तीळमात्रही घडलेलं नाही. डॉ. अरुंधती खंडकर ह्या तर्कतीर्थांच्या कन्या असल्याचा पुसटसादेखील निर्देश या चरित्रग्रंथात आलेला नाही. निकटच्या नातेवाईकानं एखाद्या चरित्रग्रंथाचं लेखन केल्यास आणखी एक गोष्ट कळत नकळत घडण्याची शक्यता असते. तो चरित्रलेखक केवळ त्या चरित्रग्रंथनायकाचा लेखकच असतो असे नाही तर समर्थकही होतो. तो चरित्रग्रंथनायकाच्या भल्याबुऱ्या वागण्याचे समर्थन करीत राहतो. काही वेळेला तर हे समर्थन इतकं दुबळं, इतकं तकलादू, इतकं हास्यास्पद असतं की ते त्या चरित्रग्रंथाला उघडउघड बाधा आणतं. या चरित्रग्रंथाच्या बाबतीत तसं काहीही घडलेलं नाही. याचा अर्थ अरुंधतीबाईंनी तर्कतीर्थांच्या आयुष्यात घडलेल्या घटनांचं

अथवा व्यक्त केलेल्या विचारांचं समर्थन केलेलं नाही, असे नाही. अरुंधतीबाईंनी तर्कतीर्थांच्या आयुष्यात घडलेल्या काही घटना-प्रसंगाचं अथवा व्यक्त केलेल्या विचारांचं समर्थन केलेलं आहे. पण ते बौद्धिक पातळीवरून पुराव्यानिशी केलेलं आहे. हे समर्थन करताना त्या काहीशा व्यथित झाल्याचही जाणवते. विशेषत: ''रीडल्स इन हिंदू इझम'' व ''मंडल आयोग'' या प्रकरणी ते आपणाला विशेषत्वाने जाणवते.

तर्कतीर्थांच्या कन्या एवढीच अरुंधतीबाईंची ओळख पुरेशी नाही. तत्त्वज्ञान व समाजशास्त्र या विषयात त्यांनी एम.ए. केलेले असून हिंदू धर्मावरील आपला प्रबंध पुरा करून त्यावर त्यांनी डॉक्टरेट मिळविलेली आहे. काही मौलिक ग्रंथाचे लेखनही त्यांनी केलेले आहे. त्या तर्कतीर्थांच्या व्यक्तिगत जीवनाच्या व कार्यकर्तृत्वाच्या डोळस साक्षीदार असल्याचा प्रत्यय या चरित्रग्रंथातल्या पानोपानी येत राहतो.

या चरित्रग्रंथात पृष्ठ क्र. ५३ वर १९८१ च्या एप्रिलमध्ये महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे विभाजन झाल्याचे व महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ व विश्वकोश निर्मिती मंडळ अशी दोन वेगवेगळी मंडळे अस्तित्वात आल्याचा उल्लेख आलेला आहे. त्याचे कारण नमूद करताना ''राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे काम ठीक चालले होते; परंतु विश्वकोशाचे काम ज्या वेगाने पूर्ण व्हावयास हवे होते ते शासनाच्या प्रशासकीय अडचणी दूर करता येईनात म्हणून थंडावू लागले'' असे म्हटले आहे. विश्वकोशाच्या या स्थितीत आजही फारसा फरक पडलेला नाही. शासकीय अडचणी कोणत्या आहेत व त्या कशा दूर करता येतील हे मंडळाच्या अध्यक्षांनी शासनापुढे नेमके व प्रभावीपणे मांडले तर त्या अडचणी दूर होऊ शकतात, असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. तसे घडले तर हा प्रश्न सुटू शकेल असे मला वाटते.

अरुंधतीबाईंनी या ग्रंथाच्या शेवटी नमूद केल्यानुसार संस्कृती व धर्मांचा मर्मज्ञ एवढीच तर्कतीर्थांची ओळख पुरेशी नाही, त्यांच्या जीवनाचा व कर्तृत्वाचा पट त्यापेक्षा बराच विस्तृत आहे. अरुंधतीबाईंनी त्यांच्या या चरित्र ग्रंथातून तर्कतीर्थांच्या जीवनाचा व कर्तृत्वाचा घेतलेला वेध केवळ मनोज्ञच आहे असे नव्हे तर तो प्रेरणादायीही आहे.

अरुंधतीबाईंचे आम्ही आभारी आहोत.

**रा. रं. बोराडे**

अध्यक्ष,

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई

दिनांक : ४ एप्रिल, २००३

# अनुक्रमणिका

# हरवलेले बालपण

धुळे जिल्ह्यातील पिंपळनेर हे एक लहानसे गाव. तेथे लक्ष्मणशास्त्रींचा १९०१ मधील जानेवारीच्या २७ तारखेचा जन्म. एका ब्राह्मण कुटुंबात जन्मलेले ते १० वे अपत्य होते. त्यांच्या वयाच्या तिसऱ्या वर्षीच आई गेली. त्यामुळे आईच्या आठवणी नव्हत्याच. परंतु आईच्या मायेने त्यांना वाढविले ते त्यांच्या बहिणीने-त्रिवेणीने. ते तिला माई म्हणत. माई ही त्यांच्यापेक्षा बावीस वर्षांनी वडील होती. तिच्या विवाहानंतर लवकरच तिच्या नवऱ्याचे निधन झाले. मग ती माघारी आली. माईने आपले दु:ख पचविले आणि तिने आपले वडील आणि दोन भावंडे, वेणीमाधव व लक्ष्मण यांची काळजी घेतली लक्ष्मणशास्त्रींचे वडील म्हणजे बाळाजी कृष्ण जोशी. ते वेदांत शिकलेले चांगले याज्ञिक होते. पण रोगाच्या साथीला बळी पडलेली त्यांची मुले व पुढे पत्नीचेही निधन झाल्यामुळे ते तसे वैराग्यशील आणि शांत स्वभावाचे होते. माई मात्र संकटे सोसूनही उत्साही होती.

तेव्हांच्या पिंपळनेरची एकूण वस्ती तीन हजारच्या आसपास होती. त्यात ब्राह्मणांची घरे होती हाताच्या बोटावर मोजण्याइतकी, तर बाकी होती ती बागायतीवर काम करणाऱ्या श्रमिक वर्गाची, वाण्यातांबोळीची, छोटे मोठे उद्योग करणाऱ्या व्यापाऱ्यांची. बहुजनसमाज हा श्रद्धाळू होता त्यामुळे ब्राह्मणांचे संसार भिक्षुकीवर चालत. चातुर्मास, कुळधर्म, कुळाचार, साधनद्धादशी, सत्यनारायणपूजा, श्राद्ध वगैरे प्रसंगी पूजा सांगण्यासाठी आणि कर्मकांडासाठी ब्राह्मणांना बोलावणी असत. इतकेच नव्हे तर एकदा शेतात ऊस तयार झाला आणि गुळासाठी काहिलीत रस रटरटू लागला की, श्रद्धाशील शेतकरी व व्यापारी ब्राह्मणांच्या घरी गुळाच्या कढत ढेपी पाठवून देत. त्यांना रस्त्यात ब्राह्मण दिसला तर, 'पाय लागो महाराज' असे अदबीने ते म्हणत. तेथे याज्ञिकी व्यतिरिक्त काही ब्राह्मण घरांतील तरुण मंडळी शिक्षकी पेशातही शिरू लागली होती. लक्ष्मणशास्त्रींच्या वडिलांना गावात चांगला मान होता.

माईच्या मागे मागे लक्ष्मणशास्त्री फिरत रहात. मात्र तिच्या मैत्रिणी संध्याकाळी

जमल्या की, ते दूर जाऊन बसत. पण त्यांचे कान मात्र त्यांच्या गप्पांकडे असत. त्या बायकांच्या गप्पा तरी कशाच्या असत तर भुताखेताच्या, कोणाला कोणत्या झाडावरच्या भुताने पछाडले किंवा कोणाच्या अंगात येऊ लागले यासंबंधी. हे ऐकताना लक्ष्मणशास्त्रींची गाळण उडे. दोरीवर टांगलेल्या कंदीलाच्या हालचालीने भिंतीवरील सावल्या मागेपुढे होत तेव्हा त्यांना घाम फुटे. एकदा का माईच्या साळकाया माळकाया पांगल्या की, पुन: ते माईच्या मागेपुढे करीत.

त्यांच्या घरामध्ये नवरात्र, पितृपंधरवडा, व्रतवैकल्ये आणि इतर नियमधर्म असत. त्यासाठी नैवेद्याचा स्वयंपाक करावा लागे. आरती, प्रसाद यासाठी तेव्हा सर्व स्वयंपाक सोवळ्यात करण्याची पद्धत होती. तसा सोवळ्याचा स्वयंपाक सकेशा विधवेच्या हातून केलेला चालत नसे. त्यामुळे माईला केशवपन करावे लागले तेव्हा लक्ष्मणशास्त्रींना धक्काच बसला. तिनेच त्यांना शांत केले. लक्ष्मणशास्त्री शाळेत जाऊ लागले. वडिलांनी म्हणजे बाबांनी त्यांना लिहावाचावयास केव्हाच शिकविले होते. अमरकोश, शिवलिलामृत, हरिविजय, तुकारामाचे अभंग आणि सुभाषिते यांच्याशी त्यांची ओळख केव्हाच तयार झाली होती. शाळेत गणिते, तोंडी हिशेब घातले की, प्रथम पाटी खाली पडायची ती लक्ष्मणशास्त्रींची. त्यांची मुंज साधारण नवव्या वर्षी झाली. वास्तविक ती आठव्या वर्षी केली की, मुहूर्त सुद्धा बघावा लागत नसे. पण त्यांचा एक भाऊ त्यावेळी न्युमोनियाने गेला त्यामुळे पुढे एक वर्षभर चांगले कार्य करता आले नाही. मुंज झाली आणि वर्षाच्या अंतराने त्यांची माई कॉलऱ्याच्या साथीला बळी पडली. त्यांच्या दृष्टीने हा दुर्दैवाचा फटका खरोखर मोठा होता. माईविना त्या घरात कसे रहावयाचे! त्यांचे मन फार बेचैन राहिले.

लक्ष्मणशास्त्रींची मुंज झाल्यामुळे बाबा त्यांना कर्मकांडासाठी काहीवेळा बरोबर नेऊ लागले. अशा प्रसंगी खास विशेष जेवण असे. पण माईच्या आठवणीने ते जेवण त्यांना गोड लागत नव्हते. ते घशातच रेंगाळे. बाबांनी त्यांना रामायण, महाभारत, संताची चरित्रे वाचण्याची गोडी लावली होती. बाबा स्वत: भाकरी करावयास शिकले होते. मुलांना ते गरम भाकरी करून देत. जोडीला गाईचे दूध आणि तूप. मागील चौकात एक दुभती गाय होती.

लक्ष्मणशास्त्रींचे काही बालमित्र होते. रामदास नथु वैद्य, शंकर बाबासाहेब देशमुख, दादा करमरकर वगैरे या मित्रांबरोबर ते गावालगत वाहणाऱ्या पांझरा नदीत पोहायचे आणि संध्याकाळी रामदास वैद्यांच्या अंगणात असलेल्या आखाड्यात कुस्ती खेळायचे. हा त्यांचा विरंगुळा असायचा. लक्ष्मणशास्त्रींना शाळेच्या चाकोरीतील

शिक्षणाचा फार कंटाळा येऊ लागला. खूप शिकावे असे त्यांना वाटत होते पण शाळेत मन रमेना. माई नाही त्यामुळे घरात करमेना. गाव सोडून शिक्षणासाठी दूर निघून जाण्याचे त्यांच्या मनात येऊ लागले. ते आपल्या सवंगड्यांबरोबर तसे बोलू लागले तेव्हा दोघांनी त्यांना 'अरे, असे भलतेसलते बोलू नकोस'-म्हटले तर, तालिमबाज मित्रांनी त्यांना पाठिंबा दिला, ते म्हणाले, ''जरूर जा, दूर गेल्यास भाग्य तुझ्या मागे येईल.'' त्यांच्या बाबांनी हा इथे राहणार नाही असे ओळखले होते. योगायोगाने देवकुळे नावाचे एक वनाधिकारी पिंपळनेरला बदलून आले होते. ते स्वत: योगाभ्यासी होते. त्यांची लक्ष्मणशास्त्रींच्या वडिलांशी गाठ पडली होती. दोघेही आध्यात्मिक प्रवृत्तीचे असल्यामुळे त्यांच्या वारंवार गाठीभेटी होत. बाबांनी 'लक्ष्मणला चांगल्या गुरुकुलात हरिद्वारला वगैरे पाठवावयाचे ठरवत आहे' असे त्यांना म्हटले. तेव्हा त्यांनी वाईला नारायणशास्त्री मराठे तशाच पद्धतीची पाठशाळा चालवतात आणि ते शास्त्रांचे अधिकारी असून आपल्या विद्यार्थ्यांची चांगली काळजी घेतात अशी माहिती दिली. शेवटी उत्तरेत दूरवर पाठविण्यापेक्षा वाईला नारायणशास्त्रींच्या प्राज्ञपाठशाळेत त्यांनी शिकावयाचे असे नक्की झाले. लक्ष्मणशास्त्रींचे वय आता बारा-तेरा होते.

**ज्ञानाच्या शोधात-** अखेर १९१४ च्या फेब्रुवारीत लक्ष्मणशास्त्री आपल्या बाबांबरोबर वाईला आले. आल्या आल्या आपण नारायणशास्त्रींना म्हणजे गुरुंना भेटावे म्हणून ते बाबांच्या मागे लागले. त्यांनी त्यांच्या उत्साहाला आवर घातला. दुसऱ्या दिवशी सकाळी कृष्णा नदीवर आंघोळ आणि आन्हिके उरकून ते गुरू ज्या मठीत राहत होते तेथे भेटीला गेले. लक्ष्मणास्त्री गुरुंना पाहताक्षणी साष्टांग प्रणिपात करून बाजूला खाली मान घालून उभे राहिले. गुरुंनी त्यांना काही जुजबी प्रश्न विचारून त्यांच्याकडे बघून स्मित केले. लक्ष्मणशास्त्रींना मनोमनी वाटले की, आपण अगदी योग्य जागी पोहोचलो. अशा गुरुंपाशी शिकावयास मिळणे यापेक्षा दुसरे भाग्य नाही. त्यांच्या जीवनातील प्रकाशमय अध्यायाची आता सुरुवात होत होती.

प्राज्ञपाठशाळा ही संस्था नारायणशास्त्री मराठेंनी १९०१ मध्ये सुरू केली. त्याठिकाणी येणाऱ्या विद्यार्थ्यांची तेथेच राहण्याची व्यवस्था असे. म्हणजे बौद्धिक शिस्तीबरोबर त्यांच्या शारीरिक स्वास्थ्याची देखील जबाबदारी नारायणशास्त्री घेत असत. येथे दाखल होणारे काही विद्येच्या ओढीने येत तर काही घरची गरिबी म्हणून शिक्षणाबरोबर चरितार्थाची सोय होई ह्या हिशेबाने येत. ५०/६० विद्यार्थी एकावेळी पाठशाळेत विविध शास्त्रात तयारी करण्यासाठी शिकत असत. पहाटे पाचला उठून,

बाजूच्या नदीवर स्नान करून विद्यार्थ्यांना तयार व्हावे लागे. स्वत:ची राहण्याची जागा आणि संपूर्ण परिसर स्वच्छ ठेवणे हे छात्रांचे काम असे. सकाळचे तास झाल्यावर दुपारचे जेवण. तेथील विद्यार्थ्यांना काही घरी माधुकरी मागून जेवणाची व्यवस्था करावी लागे. वाईत अशी अनेक घरे होती की तेथे ब्राह्मण विद्यार्थ्यांना माधुकरी म्हणून अन्न अर्पण करणे पुण्यकारक समजत असत. लक्ष्मणशास्त्रींना पहिली तीन वर्षे तरी मधुकरी वृत्तीने राहावे लागले. स्वच्छ पंचात ताटवाटी घेऊन पाचसहा ठराविक घरात जेवणाच्या वेळी जाऊन 'ओम् भवति भिक्षां देहि' असे म्हणावयाचे त्यांच्या फार जीवावर येई. परंतु स्वत: गुरूदेखील त्याच वृत्तीने जीवन जगत होते. मधुकरीवर शिकावयाचे हे एक व्रत होते.

लक्ष्मणशास्त्रींना पहिले काही दिवस संस्कृत हा एक विषय म्हणून शिकताना काही समजेना. ते गोंधळले. त्यांना मनस्वी वाईट वाटू लागले. तेव्हा स्वत: गुरुंनी त्यांना शिकविण्यास सुरुवात केली. सुरुवातीला कालिदास, बाण वगैरेंचे अभिजात साहित्य शिकविले. त्यात त्यांची झपाट्याने प्रगती होऊ लागली. हा विद्यार्थी फार लवकर तयार होत असल्याचे नारायणशास्त्रींनी जाणले आणि वर्षाच्या आत त्यांनी न्याय-वैशेषिक इ. सहा दर्शनांचे पाठ देणे सुरू केले. पाठोपाठ 'तर्कसंग्रह' न्यायपंचाननाचा 'भाषापरिच्छेद' वगैरे कठीण ग्रंथांकडे त्यांना वळविले. त्यांची साहित्य व्युत्पत्ती, शास्त्रव्युत्पत्ती लवकरच तयार झाली. दर्शने व त्यावरील टीकाग्रंथ, व्याकरण हेही पाठोपाठ शिकून झाले. हे सर्व शिकताना गुरुंनी त्यांना पाठ देणे एवढेच नसे तर तेथे पूर्वोत्तरपक्ष पद्धतीने त्यावर चर्चा होई. विद्यार्थ्याला विषय नीट समजला की नाही हे त्यावरून निश्चित कळे. त्या त्या शास्त्राची बैठक पक्की झाली की नाही, हे त्या चर्चेवरून समजे. समजलेला विषय दुसऱ्याला नीट समजावता आला की, त्या विषयाची तयारी चांगली झाली हे कळतेच.

प्राज्ञपाठशाळेच्या अभ्यासक्रमात प्राचीन शास्त्रांबरोबर इतिहास, भुगोल, भौतिकशास्त्र हे विषय होते. तेथे जसा परंपरा आणि आधुनिकतेचा मिलाफ साधला गेला तसा दुसऱ्या कोणत्याही संस्थेत असण्याची शक्यता नव्हती. अर्थात 'शांति-निकेतन ' ही रविंद्रनाथ टागोरांची संस्था अपवाद म्हणता येईल. जे जे ज्ञान म्हणून पुढे येते ते डोळसपणे स्वीकारावयाचे. परंपरेने आपल्याला अंध बनविता कामा नये असा लक्ष्मणशास्त्रींच्या गुरुंचा दृष्टिकोन होता. स्वत: गुरुंनी देखील इंग्रजी शिकण्याचा प्रयत्न केला होता. पण संस्थाचालक म्हणून जबाबदारी आणि इतर सर्वच शास्त्रांचे पाठ देण्यासाठी तयारी करणे यात त्यांना सवड झाली नाही. तरीही त्यांनी मिल,

स्पेन्सर आणि सिज्विक यांचे मराठीत भाषांतरित होऊन आलेले लिखाण वाचले. त्यामुळे त्यांच्या विचाराची झेप परंपरागत शास्त्रांच्या पुढे गेली यात आश्चर्य नव्हते. त्यांच्यामुळेच प्राज्ञपाठशाळेच्या वातावरणात राष्ट्रीयत्वाची प्रेरणादेखील शिष्यांना मिळत गेली. अशा गुरूमुळे आणि तेथे वैचारिक वातावरणाला कुंपण नसल्यामुळे लक्ष्मणशास्त्रींचे विशेष वेगळे व्यक्तित्व तयार झाले.

त्यांच्या वयाच्या १७ व्या वर्षी नारायणशास्त्रींकडून वेदांत शिकावा या हेतूने विनोबा भावे वाई येथे आले. त्यांचे व लक्ष्मणशास्त्रींचे राहणे एकाच खोलीत होते. विनोबांनी लक्ष्मणशास्त्रींना इंग्रजी शिकविले इतकेच नाही तर त्यांना त्या भाषेची गोडी लावली. लक्ष्मणशास्त्रींच्या जीवनातील विनोबांबरोबरील सहवास हा एक चांगला योगायोग होता. त्यांना इंग्रजी समजू लागल्यावर त्या भाषेतून लिहील्या गेलेल्या पाश्चात्य विचारवंतांचे, विशेषत: मिल, स्पेंसर, टॉलस्टॉय यांचे साहित्य त्यांनी वाचून काढले. ललित साहित्यापेक्षा वैचारिक लेखनाकडे लक्ष्मणशास्त्रींचा अधिक कल होता. वर्षभरात विनोबा बडोद्यास परत गेले. परंतु लक्ष्मणशास्त्रींना त्यांच्याकडून आणखी मार्गदर्शन हवेसे वाटले. गुरुजींकडे त्यासाठी परवानगी मागण्याचा त्यांना धीर झाला नाही. ते त्यांना न कळविताच बडोद्याला गुपचुप निघून गेले. लक्ष्मणशास्त्री एवढ्यावर थांबले नाहीत. तर त्यांनी आपले वाढविलेले केस कापून घेतले. हा खटाटोप एवढ्यासाठी की आपल्याला कोणी ओळखू नये.

विनोबांकडे सहा एक महिने शिकताना एके दिवशी विनोबांनी त्यांना ''तू चांगला शिकला सवरलास, आता साबरमतीला गांधींच्या आश्रमात जावेस. तिथे तुझ्या सारख्यांची फार गरज आहे.'' असे म्हटले. हे ऐकल्यावर विनोबांचा अंतस्थ: हेतू वेगळाच असल्याचे लक्ष्मणशास्त्रींच्या लक्षात आले. ते एकदम चपापले. मग लगेच सावरलेही. ते ज्याप्रकारे गुपचुप बडोद्यास निघून आले होते, त्याचप्रकारे त्यांनी रातोरात बडोदा सोडले आणि वाईत परतले. गुरुजींच्या पाया पडून क्षमायाचना केली. पश्चातापाने ते पोळले होते. प्राज्ञपाठशाळेत जे जे शिकणे होते ते सर्व शिकून झाले होते. गुरुजींच्या परवानगीने ते तेथेच विद्यार्थ्यांना पाठ देऊ लागले. एव्हाना ज्ञानात आणखी भर पडली होती. विष्णुशास्त्री चिपळूणकरांची 'निबंधमाला', आगरकरांचे लिखाण, शि. म. परांजपे यांचे निबंध, ज्योतिबा फुले इत्यादींचे ग्रंथ त्यांनी वाचून काढले होते. गुरुंबरोबर अनेक विषयांची त्यांची चर्चा होत राहिली. या सुमारास लक्ष्मणशास्त्रींच्या विचारात बराच फरक पडला. अनेक धर्मसमजुती त्यांना निरर्थक वाटू लागल्या. जातिनिर्बंध अन्यायकारक असून त्यामुळे सामाजिक प्रगती होत नसल्याचे लक्षात

आले होते. धार्मिक रीतीरिवाजांवरील त्यांचा विश्वास उडाला होता. नारायणशास्त्रींनी लक्ष्मणशास्त्रींना आणखी पुढे शिकावयाचे असल्यास वाराणसीला जाण्याचा सल्ला दिला. तिकडे एकेका दर्शनाचे अधिकारी पंडित होते. त्यांच्या गुरुकुल धर्तीच्या पाठशाळा होत्या अधिक ज्ञानासाठी लक्ष्मणशास्त्री काहीसे अस्वस्थ झाले होते. गुरूंच्या आशिर्वादाने ते वयाच्या १८ व्या वर्षी वारासणीला पोहोचले.

ते वाराणसीला बिंदुमाधव घाटावरील योगानंदांच्या मठीत तीन वर्षे राहिले. त्यांनी वामाचरण भट्टाचार्य, राजेश्वरशास्त्री, पंचानन, तर्करत्न भट्टाचार्य, यांच्यासारख्या प्रख्यात नैयायिकांकडे आलटून पालटून पाठ घेतले. एकापेक्षा एक वरचढ असा त्या सर्वांचा शास्त्रातील मोठा अधिकार होता. गंमत म्हणजे न्याय-नव्यन्याय यातील सर्व तयारी लक्ष्मणशास्त्रींनी गंगाकाठावरील पंडितांकडे केली खरी परंतु 'तर्कतीर्थ' ही पदवी मात्र त्यांनी १९२२ मध्ये कलकत्याच्या शासकीय संस्कृत विद्यालयातून घेतली. त्यानंतर ते वाईला आपल्या पाठशाळेत अध्यापनासाठी परतले.

वाराणसीच्या मुक्कामात तर्कतीर्थांना एका मोठ्या संकटातून जावे लागले. १९१८ मध्ये इन्फ्लुएंझाची साथ भारतभर पसरली. तर्कतीर्थ आपल्या मठीत एकटेच रहात असत. अशावेळी त्यांना त्या तापाची लागण झाली. अंगात उठण्याचे बळ उरले नाही. दोन-तीन दिवस तसेच काढले. एका सकाळी ते कण्हत पडले होते. त्यांच्या तोंडात पाण्याचा थेंबही पडला नव्हता. साथीला बळी पडणाऱ्या शेकडो लोकांवर दुर्गाघाटापलिकडे अंत्यसंस्कार होत होते. पडल्यापडल्या त्यांना भडकणाऱ्या चितेच्या ज्वाला दिसत होत्या. दफनभूमीकडे नेत असलेले मृत देहही तेथून दिसत. त्यांच्या कण्हण्याचा आवाज बिंदुमाधव मंदिरातील पूजा संपवून निघालेल्या बाईंच्या कानावर पडला. त्या थबकल्या व मठीत डोकावून त्यांनी विचारले 'काही मदत हवी का?' त्या होत्या तेथील वैशंपायन नावाच्या व्यवस्थापकांच्या पत्नी. लक्ष्मणशास्त्रींनी हात जोडून क्षीण आवाजात म्हटले, 'डोली बोलावून मारवाडी हॉस्पिटलमध्ये पोहचवण्याची व्यवस्था झाली तर बरे'. त्या बाईंनी लगेच तशी व्यवस्था करविली. ते हॉस्पिटल निराधारांसाठी चालवले होते. हॉस्पिटलच्या बाहेर अनेक रुग्णांची रांग होती. डॉक्टर स्वत: बाहेर येऊन एक-एक रुग्ण बघत राहिले. ज्यांची स्थिती उपचाराला दाद देऊ शकणार नव्हती त्यांना ते बाहेरच औषध देऊन परत पाठवत. लक्ष्मणशास्त्रींचे जीभ, डोळे पाहून त्यांनी लगेच एक खाट मागवून त्यांना आत नेले. त्यांना तीन दिवसाचे लंघन घडल्यामुळे बाकी अडचण आली नाही. आठ दिवसांनी लक्ष्मणशास्त्री पायावर उभे राहू शकले. पुढील आठ दिवस पायात आणखी ताकद आल्यावर त्यांना

हॉस्पिटलमधून मठीत जाण्याची परवानगी मिळाली.

उत्तर हिंदुस्थानातील उन्हाळा फार कडक असतो. त्यामुळे दरवर्षी तर्कतीर्थ उन्हाळ्यात वाईला परतायचे. वाईत प्राज्ञपाठशाळेत आपल्या गुरुंच्या सांगण्यावरून विद्यार्थ्यांना न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदान्त या विषयात पाठ देत. प्राज्ञपाठशाळेतील त्यांचे काही शिष्य म्हणजे महादेवशास्त्री गोखले, पांडुरंगशास्त्री गोस्वामी, रघुनाथशास्त्री कोकजे, शंकर गंगाधर वर्तक वगैरे होत. त्या सर्वांनाच तर्कतीर्थांप्रमाणे वाराणसीला जाऊन शिकावयाचे होते. त्यातील कोकजे मात्र तसेच शिकून 'तर्कतीर्थ' झाले.

हाच काळ म्हणजे म. गांधी दक्षिण आफ्रिकेतून परतले होते- तेव्हाचा म. गांधींबद्दल लोकांमध्ये प्रचंड कुतुहल होते. राजकीय हालचालींना वेग आला होता. समाजात धार्मिक प्रथांपलिकडे अधिक अर्थपूर्ण असे काहीचालले असल्याची जाणीव निर्माण झाली होती. हीच जाणीव केवलानंदांच्या मार्गदर्शनाखाली तयार होत असलेल्या तरुण विद्यार्थ्यांमध्ये उत्कटतेने उमटत होती. स्पेन्सरच्या समाजशास्त्राच्या वाचनाने आपल्या विद्यार्थ्यांना नव्या विचारांसाठी ते प्रवृत्त करू लागले. त्यांनी परंपरेतील शास्त्रे आहेत तशी शिकावीत पण विज्ञानाने पुढे येत असलेले ज्ञानही लक्षात घेतले पाहिजे असे वाटले. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे केवलानंदांना असे जाणवले की, इकडील धर्मशास्त्रात वेळोवेळी बदल होत गेला आहे. अनेक धर्मपंडित होऊन गेले. त्यांनी धर्मग्रंथ चांगल्या प्रकारे अभ्यासिले परंतु केवलानंदांनी ऐतिहासिक दृष्टिकोनातून धर्मग्रंथांचा निष्कर्ष काढला. तसा अर्थ इतर कोणाला त्यापूर्वी कळला नाही. स्मृतिग्रंथावरून धर्मात कालांतराने कसा फरक होत गेला हे लक्षात येते. म्हणून केवलानंदांना असे जाणवत राहिले की, कालांतराने समाजात फरक पडला आहे तेव्हा धर्म देखील त्याला अनुसरून बदलणे आवश्यक आहे. धर्मसुधारणा होण्याची निकड त्यांनी जाणली. त्यांच्या हाताखाली धर्मसुधारणावादींचा गट तयार होऊ लागला. धार्मिक विचारांच्या चळवळीची ही नांदी होती.

सुधारणावादी आणि परंपरावादी यांचे वाद वेळोवेळी होऊ लागले. केवलानंद चांगले विचारी पण प्रत्यक्ष वादविवादात ते लक्ष्मणशास्त्रींना पुढे करीत असत. त्यांचा लक्ष्मणशास्त्रींच्या वादकौशल्यावर पूर्ण भरवसा होता. वाईत १९२३ मध्ये 'ब्राह्मणपरिषद' भरवली गेली होती तर कुकुरमुंडे येथे 'धर्मपरिषद', त्या परिषदा गाजल्या कारण परंपरावाद्यांशी लक्ष्मणशास्त्रींचा झालेला युक्तिवाद. १९२८ मध्ये काशीला 'अखिल भारतवर्षीय ब्राह्मण महासंमेलन' झाले. या सर्व ठिकाणी ही

गुरुशिष्यांची जोडी नजरेत भरे. केवलानंदांनी नजरेने खुणावले की, तर्कतीर्थ तत्परतेने उठत आणि आपला पक्ष मांडीत. परंपरावादींचा युक्तिवाद निकालात काढून ते गुरूंची धर्मविषयक प्रागतिक मते ठामपणे मांडत. पुणे, कोल्हापूर, नाशिक याठिकाणी तेव्हा काही संस्कृत पाठशाळा होत्या. त्यात परंपरा जतन करणारे शास्त्री, कीर्तनकार, पुराणिक तयार होत असत. केवलानंदांच्या पाठशाळेत ते शिक्षण मिळेच परंतु, ते नव्या राजकीय ध्येयवादाला पूरक आणि धार्मिक परिवर्तनाच्या वातावरणात.

तर्कतीर्थांना २६ वे वर्ष चालू होते. धर्मसुधारणा आणि त्यायोगे सामाजिक परिवर्तनाबाबतचा उत्साह त्यांना स्वस्थ बसू देत नव्हता. त्यांच्या बाबांना तसेच गुरुंना वाटले की, 'लग्नासाठी उशीर होतो आहे, लक्ष्मणने लग्न केल्यास तो एके जागी स्थिरावेल.' त्यांनी तसे सुचविल्यानंतर लक्ष्मणशास्त्री आपल्या दोन तीन मित्रांना घेऊन मुली पाहण्यास तयार झाले. दोन एक घरी जाऊन आल्यावर मुल्हेर येथील वासुदेव पंडितांच्या घरी त्यांच्या कावेरी नावाच्या १४ वर्षांच्या मुलीला ते पाहण्यास गेले. तेथील हसतमुख, गौर वर्णाच्या, कुरळ्या केसाच्या मुलीला त्यांनी लगेच होकार दिला व तसे त्यांनी आपल्या बाबांना कळवले. बाबांना वाटले होते, इतका शिकलेला माझा मुलगा, आपल्या विद्वत्तेने तो संमेलने गाजवतो त्याला कोणत्याही संपन्न घरातील मुलगी सहज मिळेल. परंतु एकदा त्यांनी निवड केल्यावर ते काहीच बोलले नाहीत. पुढील दोन-तीन आठवड्यात तर्कतीर्थांचा विवाह झाला. पंडितांकडची परिस्थिती बेताची असल्यामुळे सर्व खर्चाची जबाबदारी तर्कतीर्थांच्या वडील भावाने उचलली. तर्कतीर्थांनी लग्नानंतर आपल्या पत्नीचे नाव सत्यवती असे ठेवले. त्यांनी विवाहानंतर वाईत बिऱ्हाड केले. वय होत चालल्यामुळे त्यांचे बाबा पिंपळनेर सोडून वाईला राहवयास आले. थोड्या अवधीत त्यांनी याज्ञिकी सुरू करून आपला जम बसविला. त्या सुमारास गांधींच्या काही चळवळींना यश येत होते. त्यांना पुनः पुनः सत्याग्रहाच्या प्रसंगी बंदी म्हणून निर्बंधांना तोंड द्यावे लागले. लो. टिळक आता नव्हते. स्वातंत्र्याच्या आंदोलनात आता नाव मोठे होते ते गांधींचे. भारतात आणि परदेशात त्यांच्या अहिंसात्मक लढ्याबाबत लोकांना फार कुतुहल होते. लक्ष्मणशास्त्री गांधींनी उभारलेल्या चळवळीपासून अलिप्त राहू शकले नाहीत. ते त्या प्रचारासाठी बाहेर पडले आणि दोनवेळा कारावासात स्थानबद्ध झाले. म्हणजे लग्न झाल्यावर ते एके जागी राहतील हे खरे ठरले नाही. दरम्यान त्यांच्या बाबांचे निधन, नंतर १९३० मध्ये त्यांच्या पहिल्या मुलाचा जन्म आणि तीन एक वर्षांनंतर मुलीचा जन्म झाला. तेव्हा ते सत्याग्रहासाठी कारागृहात दूर बंदीत होते. दैनंदिन संसारातील सर्व बाबी त्यांच्या

पत्नीने म्हणजे सत्यवतीबाईंनी सांभाळल्या.

१९३२ मधील कारागृहवास संपल्यानंतर तर्कतीर्थ घरी परत आले तेव्हा सत्यवतीबाईंनी त्यांना एकदा सांगितले की, ''तुमचे बाहेरगावी जाणे-येणे असते तेव्हा अनेकवेळा देव्हाऱ्यातील देव पारोसे राहतात. त्याची पूजा होत नाही तर आपण काही वेगळा मार्ग काढूया.'' त्यावर त्या दोघांनी एक विचार केला. त्यांनी घरातील सर्व देवांची त्या दिवशी यथासांग पूजा करवून घेतली. विशेष नैवेद्याचा स्वयंपाक केला. नैवेद्य दाखवून देव्हाऱ्यातील देव सजवून ते कृष्णेच्या काठावर आले. त्या दिवशी कृष्णेला मोठा पूर आलेला होता. वेगाने घोंघावत धावणाऱ्या पाण्याच्या प्रवाहात त्यांनी मंत्र म्हणत घरातील देवांचे विसर्जन केले. त्या दिवसापासून लक्ष्मणशास्त्रींच्या घरात बहुतेक इतर घरांमध्ये दिसणारा देव्हारा नव्हता. तेथे नित्यनैमित्तिक पूजा कधी झाली नाही. उपास-तापास, सोवळे-ओवळे असे काहीही उरले नाही. त्याबद्दल सत्यवतीबाईंना कधी खंत वाटली नाही. धर्मप्रथांमधून बाहेर पडण्यात त्या तर्कतीर्थांच्या काकणभर पुढे होत्या. खरे म्हणजे या प्रकारच्या धार्मिक आचरणाला रजा देण्याची कल्पना त्यांचीच. लक्ष्मणशास्त्रींनी वैचारिकदृष्ट्या धार्मिक प्रथांना रजा दिली होती तरी प्रत्यक्ष आचरणात तसे उतरविण्याचे काम सत्यवतीबाईंनी केले. असे आधुनिक विचार-आचाराचे घर आजही सापडणे कठीण आहे.

लक्ष्मणशास्त्रींच्या घरी संस्थेला भेट देण्यासाठी येणाऱ्या पाव्हण्या-रावळ्यांची ये-जा असे. प्रतिष्ठित आणि विद्वान मंडळींची ऊठबस असे. त्यांचे स्वागत, चहापाणी, जेवणखाण हे सर्व सत्यवतीबाई मोठ्या अगत्याने करीत. केवलानंदांनी त्यांच्या जीवनातील अखेरची सहा वर्षे दुपारचे जेवण त्यांच्या घरी घेतले. शेवटी दीडदोन महिने ते आजारी पडले तेव्हा आपली मठी सोडून प्राज्ञपाठशाळेच्या परिसरातील एका दालनात येऊन राहण्यास ते तयार झाले. सत्यवतीबाई आणि प्राज्ञपाठशाळेतील इतर सहकारी या सर्वांनी त्यांची शुश्रुषा केली. लक्ष्मणशास्त्रींच्या घराला या विद्वान संन्याशाच्या आशीर्वादाचे कोंदण होते. कृष्णेच्या तीरावरील हिरव्यागार डोंगरांचे नित्य दर्शन देणारे त्यांचे घर संस्थेच्या परिसरात होते. लक्ष्मणशास्त्रींचे वाचन-लिखाण जवळच्या मोठ्या दालनात होई. भिंतीला लागून असलेल्या डझनभर कपाटात इंग्रजीतील आणि मराठीतील शेकडो ग्रंथ नीट लावून ठेवलेले असत. आपल्या अभ्यासिकेत कोणी अचानक भेटीला आल्यास त्यांना बसण्यासाठी खुर्च्या मांडलेल्या होत्या. त्यांच्या भव्य टेबलामागील खिडक्यांतून घाटाकडून वहाणारा निर्मळ वारा आणि लख्ख प्रकाश आत शिरे. या अभ्यासिकेत राधाकृष्णन् येऊन गेले होते. इंदिरा

गांधी, वेणुताई चव्हाण याही येऊन गेल्या होत्या. यशवंतराव चव्हाणांचा विरंगुळा म्हणजे तेथे येऊन शास्त्रीजींशी गप्पा मारणे असा होता. शरदराव पवार, शंकरदयाळ शर्मा धर्मकोशाचे काम बघण्यासाठी वाईला आले होते. त्यांनी तर्कतीर्थांबरोबर काही तास तेथे घालविले होते. केवलानंद सरस्वतींच्या प्राज्ञपाठशाळेने अनेक पुरोगामी विद्वान तयार केले. त्यासाठी सांस्कृतिक आणि बौद्धिक जीवनात अजोड कर्तृत्वाची मंडळी वावरत होती. डॉ. भांडारकर, न्या. रानडे, विष्णुशास्त्री पंडित, भाऊ दाजी लाड, वि. ना. मंडलिक वगैरे मंडळी त्या सुमारास सामाजिक परिवर्तनासाठी झटत होती. म.म. पां. वा. काणे, के. ल. दफ्तरी, श्रीधर शास्त्री पाठक, रघुनाथशास्त्री कोकजे इ. मंडळींचा धार्मिक ग्रंथांवरचा अधिकार मोठा होता. या पंडितांचा प्राज्ञपाठशाळेशी नेहमी संबंध असे. गुरुकुल पद्धतीच्या धर्तीवर चालणाऱ्या पाठशाळेत आधुनिक राष्ट्रीयत्वाचे वारे वाहू लागले. त्याला या विद्वानांचा पाठिंबा होता. पाठशाळेत शास्त्रार्थ चाले तसेच राष्ट्रासंबंधी प्रश्नांवरही केवलानंद चर्चा घडवून आणीत. एवढेच नव्हे तर ते लुटुपुटूचे पार्लमेंट भरवून विद्यार्थ्यांचे गट पाडून चर्चेची शिस्त लावीत. याचा परिणाम म्हणूनच की काय सामाजिक जीवनात इतके गुंतून जाताना तर्कतीर्थांचे बौद्धिक वळण सुटले नाही. १९/२० व्या शतकात तयार झालेल्या बौद्धिक परंपरेचे एकाददुसरा अपवाद वगळता, ते अखेरचे विद्धान म्हणता येतील.



# धर्मसुधारणांचा आग्रह

जवळजवळ संपूर्ण विसावे शतक हा तर्कतीर्थांचा जीवनकाळ ठरतो. या काळात जागतिक इतिहासात अनेक नाट्यमय घटनांनी गर्दी केलेली दिसते. त्यामुळे सर्व जगच काळजीच्या खाईत लोटले गेले होते. दोन जागतिक महायुद्धे झडली ती विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात. युद्धात होरपळलेली राष्ट्रे व बाकीची राष्ट्रे या सर्वांना आपापसातील संबंधाचा नव्याने विचार करणे भाग पडले. हा काळ भारताच्या आधुनिक इतिहासात फार महत्त्वाचा होता. भारतीय प्रबोधनाची लक्षणे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस राजा राममोहन रॉय यांच्या रूपाने प्रकट झाली आणि पुढील शतकात महाराष्ट्रात त्याची बीजे चांगली रुजली. ज्योतिबा फुल्यांची 'सार्वजनिक सत्यधर्माची चळवळ', ब्राह्मसमाज, न्या. मू. रानड्यांच्या 'प्रार्थनासमाज' यासारख्या चळवळींमुळे समाजाला वेगळी जाण आली. त्यांच्या बरोबरीने हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीला वेग येत होता. प्रखर राष्ट्रभक्तीने भारलेल्या न्या. मू. रानडे, ना. गोखले, लो. टिळक, म. गांधी यांच्यासारख्या अजोड कर्तृत्वाच्या मंडळींनी आपले सर्वस्व पणाला लावले होते. त्यामुळे अखेर हिंदुस्थानाचे स्वातंत्र्य हे स्वप्न न राहता ते प्रत्यक्षात उतरले. ते याच विसाव्या शतकात.

महाराष्ट्रात सांस्कृतिक पटलावर डॉ. भांडारकर, न्या. मू. तेलंग, विष्णुशास्त्री पंडित, राजारामशास्त्री भागवत, भाऊ दाजी लाड यांच्यासारखे कित्येकजण सामाजिक परिवर्तनाच्या कामात आपले जीवन जोडत होते. त्यांच्यात विद्वत्ता, त्याग, चारित्र्य या गुणांनी परिसीमा गाठलेली होती. या सर्वांना पाश्चात्य विद्येचा परिसस्पर्श झाला होता. अशावेळी इंग्रजी शिक्षणाची संधी नसताना केवलानंद सरस्वतींच्या प्राज्ञपाठशाळेत समाजसुधारणांना पोषक असे वातावरण तयार झाले हे एक आश्चर्य घडले. तेही वाईसारख्या विद्वान परंतु कर्मठ पंडितांच्या गावात.

प्रत्येक कालखंडाचे काही खास प्रश्न समाजाला भेडसावत असतात. त्यातील काही प्रश्न असे कठीण असतात की, अनेक कालखंडात त्यावर उपाय सापडत

नाहीत. भारतीय समाजाला धार्मिक आणि सामाजिक निर्बंधाचा फटका शतकानुशतके बसत राहिला, मात्र त्याची जाण आली ती १९व्या शतकाच्या उत्तरार्धात. जन्मजात जातीय विषमतेमुळे इकडील समाज दुबळा झालेला दिसत होता. परकीयांच्या स्वाऱ्या होत पण त्यांच्याशी एकजुटीने सामना करता येत नव्हता. सामाजिक आणि आर्थिक अडचणीतील भारतीय समाज अतिशय विस्कळीत झालेला होता. पराभवाच्या छायेत वावरणाऱ्या येथील समाजाला वर येण्यासाठी एकच उपाय होता. तो म्हणजे समाजात बदल घडवून आणणे. समाजव्यवस्थेत'परिवर्तन झाले पाहिजे असे जेव्हां विचारवंतांना वाटू लागले तेव्हां त्या समाजाला आशेची किरणे दिसण्याची शक्यता निर्माण झाली. भारतीय प्रबोधनकालाची सुरुवात अशाच काही समाजचिंतकांच्या जाणीवेपासून झाली. प्रत्येक सामाजिक व्यवस्थेमागे काही विचारसरणी असते. त्यात बदल हवा असेल तर त्यामागील विचारसरणीत महत्त्वाचा फरक व्हावा लागतो. प्राज्ञपाठशाळेतील वैचारिक वातावरणात आधुनिकतेचे मोकळे वारे वहात होते. याचे एक कारण म्हणजे संन्यासी असूनही केवलानंदांनी सामाजिक परिवर्तनाची निकड जाणली. तळेगाव-दाभाडे येथील समर्थ विद्यालय इंग्रज सरकारने बंद करायला लावल्यामुळे राष्ट्रीय भावनेने प्रेरित असे तेथील काही प्रौढ विद्यार्थी प्राज्ञपाठशाळेत दाखल झाले होते. त्यामुळे परंपरेतील शास्त्रांच्या अभ्यासाबरोबर आधुनिक विचार व त्यावर चर्चा तसाच कार्यक्रम हा तेथील विद्यार्थीजीवनाचा भाग झाला होता.

भारतीय स्वातंत्र्याच्या आंदोलनाला वळण देणाऱ्या लो. टिळकांनी प्राज्ञपाठशाळेला भेट दिली होती. पुढे चार वर्षांनी म. गांधी वाईत आले आणि केवलानंदांची त्यांनी भेट घेतली. त्या वास्तूत ते प्रसन्न होऊन परतले होते. राष्ट्रीय जीवनात महत्त्वाची भूमिका बजावणाऱ्या व्यक्ती तेथे येऊन गेल्यामुळे प्राज्ञपाठशाळेसारख्या संस्थेचे नाव सगळीकडे गाजत होते. केवलानंदांचा पिंड हा विचारवंतांचा. खरे तर समाजचिंतकाचा. वैष्णवभागवतावर ते वर्षाकाठी जेव्हां प्रवचन करीत तेव्हां त्यांच्या लक्षात काही गोष्टी येऊन चुकल्या. निरनिराळे वर्ण खालीवर होत असत. अशी अनेक उदाहरणे भागवतात मिळून गेली. गोत्रे, महर्षी, सप्तर्षी यांचे वर्णांतर होत गेले. यावरून एक गोष्ट सहज लक्षात येई की, हा असा काळ होता की, तेव्हां समाज बदलत होता. त्यात प्रौढ विवाह झालेले होते. घटस्फोट सुद्धा होत. समाजात एके काळी 'जाती' नव्हत्या, पण वर्ण होते. महाभारतात, तत्पूर्वी गौतम बुद्धाच्या काळातही 'धर्म' 'वर्ण' या विषयावर अनेक प्रसंगी चर्चा झालेली

दिसते. याचा अर्थ सरळ आहे. धर्म बरोबर आहे किंवा चुकीचा हे कसे समजते तर समाजाकडे बघून. समाजात प्रगती होते याचा अर्थ धर्म योग्य आहे आणि समाजात लोकांची प्रगती थांबते, तेव्हां तो हितकारक नाही. धर्म हा समाजाच्या हितासाठी चांगल्या समजदार लोकांनी बनविला आहे. ईश्वराने नव्हे म्हणून तो प्रगतीच्या आड येऊ लागला की, तो बदलावा लागतो असा विचार प्राज्ञपाठशाळेतील शिक्षणाचा गाभा होता. तर्कतीर्थ वाढले ते या अशा विचारधारांवर.

प्राज्ञपाठशाळेत केवलानंदांच्या नेतृत्वाखाली प्रथम आकार घेत होते ते धर्मसुधारणेचे आंदोलन. महाराष्ट्रात धार्मिक परिवर्तनाचा ओघ तेथून सुरु झाला. १९२३ पासून तो ओघ पुढे महाराष्ट्रापुरता मर्यादित राहिला नाही. तर्कतीर्थांनी पश्चिमी चिंतकांच्या धर्मविषयक ग्रंथांचा सखोल अभ्यास केला. केवलानंदांनीही धर्मग्रंथांचा अर्थवाद ऐतिहासिक पद्धतीने लावण्यास सुरुवात केली होती. तशीच पद्धती स्विकारून धर्म, रुढी आणि सामाजिक वास्तव यांचा संबंध तर्कतीर्थांनी पडताळून पहाण्यास सुरुवात केली. धर्मातील परिवर्तनीय भाग तपासून तो सगळ्यांपुढे मांडण्याचा त्यांचा प्रयत्न होता. या अशा कार्यक्रमामुळे धर्मविषयक दोन विरोधी गट एकमेकांसमोर ठाकले. एक म्हणजे परंपरावादी. त्यांची, धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत असल्याची खोलवर श्रद्धा होती. त्यामुळे धार्मिक आज्ञा आणि वर्तन यात कोणताही बदल त्यांच्या दृष्टीने पाखंडीपणा होता. तो अधर्म ते कधी मान्य करणार नव्हते. दुसरा गट म्हणजे धर्मग्रंथ, मनुष्याची, चांगल्या माणसाची ती कृती असून कोणत्याही मानवी कृतीप्रमाणे त्यात सुधारणा करण्यास वाव आहे असे मानणारा. या सुधारणावादी गटाच्या मते काळाबरोबर धर्म बदलतो. प्राज्ञपाठशाळेने परिवर्तनवादी किंवा धर्मात सुधारणा हव्यात असे म्हणणाऱ्या गटाला प्राधान्यं दिले. त्या धर्मसुधारणेच्या आंदोलनाचे नेतृत्व जरी केवलानंदांचे होते तरी त्याबाबत वादविवाद, चर्चा, प्रतिपादन करण्यासाठी त्यांनी तर्कतीर्थांना तयार केले. केवलानंद हे मितभाषी म्हणून आपली मते आणि विचार मांडण्याकरिता युक्तिवाद करण्यासाठी त्यांनी तर्कतीर्थांना निवडले. मात्र असे प्रगतीपर विचार करणारे तेथे अनेकजण होते.

राष्ट्रीय आंदोलनाला पूरक असे हे धर्मसुधारणेचे आंदोलन. त्याची सुरुवात उत्साहाने झाली. सनातनी पंडितांचा वर्ग आणि सुधारणावादींचा वर्ग यांच्यात वादविवाद सभा होऊ लागल्या. अशा सभांमध्ये चर्चेसाठी जे विषय निवडले जात ते प्रामुख्याने स्त्रीच्या विवाहाचे वय कोणते, वर्ण आणि पोटजातींना आपापसात लग्न करता येते की नाही, सर्व आचारधर्म पाळले न गेल्यास प्रायश्चित काय, स्त्रिया स्वतःचा

विवाह स्वत: करू शकतात की नाही, त्यांना विवाहातून बाहेर पडण्याचा हक्क आहे किंवा नाही, जातिभेद पाळणे जरूर आहे किंवा कसे, तो सोडणे म्हणजे अधर्म होतो का, असे.

अशीच एक महत्त्वाची धर्मसभा १९२३ मध्ये सोनगीर येथे भरविण्यात आली. कुकुरमुंड्यांचे संतोजी महाराज, सोनगीरचे केशवदत्त महाराज, म. म. अनंत कृष्णशास्त्री अशी सनातन्यांची बाजू मांडण्यासाठी शास्त्रात तयार असलेली मंडळी होती. पुरोगामी धर्मविचार स्वत: केवलानंद, दिवेकरशास्त्री, भिडेशास्त्री आणि तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांनी मांडावयाचे असे ठरले. वातावरणात अवघडलेपणा आणि दबदबा होता कारण दोन्ही बाजूला तोलामोलाचे पंडित होते. नुसती कुजबुज सुरु झाली पण पूर्वपक्ष मांडला जाईना. तेव्हां, केवलानंदांनी म्हटले, ''ठीक, लक्ष्मण तू सुरवात करतोस का?' लक्ष्मणशास्त्री तत्परतेने उठले आणि त्यांनी आपली बाजू मांडली. ते म्हणाले, धर्मग्रंथांचा काळजीपूर्वक तपास केल्यास धर्म पालटत गेल्याचे कोणत्याही माणसास कळून यावे. इंद्रियसंयमी माणूस हे जाणतो. त्यांच्या या भूमिकेवर अनंतकृष्णशास्त्रींनी जोरदार आक्षेप घेऊन शारीरभाष्यात शंकराचार्यांनी, धर्म हा श्रुतीवरून समजतो एरवी नाही असे ताडकन् म्हटले. त्यावर तर्कतीर्थांचे सांगणे होते की, शंकराचार्य हे एक माणूसच होते तेव्हां त्यांच्या प्रामाण्याचा दाखला काय कामाचा? अनंतकृष्णशास्त्रींनी शंकराचार्यांसारख्याचा हा अवमान आहे असे म्हणत ते सभा सोडून जाऊ लागले. सभेचे वातावरण त्यामुळे फार तापले, तेव्हा केवलानंदांनी 'लक्ष्मण पूर्वपक्ष मांडतो आहे, त्याचा प्रतिवाद करा, पण सभा भंग करू नका' असे म्हटले. ती बैठक तीन दिवस अठरा तास चालू होती. कोणी जिंकले नाही की कोणी हरले नाही. चिंतामणराव वैद्य तेव्हां तर्कतीर्थांना म्हणाले 'अरे, तुला 'लक्ष्मणशास्त्री महाराष्ट्र' हा किताब देऊ, पण तू वाद घालायचे सोड. या पंडितांबरोबर वाद घालणे म्हणजे भिंतीवर डोके आपटणे ठरते.' सोनगीरच्या वादसभेतून भरीव असे काही निष्पन्न झाले नाही तरी अशा सामाजिक प्रश्नांना वाचा फुटू लागली हे चित्र आशादायी होते.

धार्मिक आणि सामाजिक प्रश्न उपस्थित होऊ लागल्यावर त्यांची तड लागल्याखेरीज समाजात अस्वस्थता रहातेच. धर्मप्रथा ह्या पवित्र असून त्यात ढवळाढवळ उपयोगाची नाही असे सनातनी पंडितांना तीव्रपणे जाणवू लागले. म्हणून सुधारणावादींची तोंडे वेळेवर बंद करावीत यासाठी १९२८ मध्ये वाराणसीला अखिल भारतवर्षीय ब्राह्मण महासंमेलन भरविण्यात आले. त्याची जय्यत तयारी सुरू झाली.

परंपरावादी तसेच सुधारणावादी पंडितांकडून काही विषयांवर आधीच निबंध मागविले गेले. कलकत्ता, मद्रास, उत्तरभारत वगैरे ठिकाणाहून सातशे पंडित तयारीने त्या ठिकाणी एकत्र आले होते. एकेका विषयावरील वादविवादावर निर्णय देणारे विद्वान, सभेचे सूत्रसंचालन करणारे पंडित आणि दोन्ही पक्षांमधील कोणी बोलावयाचे हे सर्व निश्चित करण्यात आले होते. महाराष्ट्रातून श्रीधरशास्त्री पाठक, के. ल. दप्तरी, लक्ष्मणशास्त्री मुरुडकर, दिवेकर शास्त्री आणि लक्ष्मणशास्त्री जोशी हे सुधारणावादींचे प्रतिनिधी म्हणून हजर राहिले. अशा वादसभात दोन्ही पक्षांना बंधनकारक अशी नियमावली म्हणजेच समयबंध तयार करण्याची पद्धत होती. ती दोन्ही पक्षांच्या विचाराने ठरवली जाण्याची रीत होती. पण या महासभेत सुधारणावादींना विश्वासात न घेताच समयबंध वाचून दाखविला गेला. त्यामुळे काही सुधारणावादी निषेध म्हणून सभेतून उठून गेले. लक्ष्मणशास्त्रींनी तसे केले नाही. कारण मग आपली बाजू महासभेपुढे मांडण्याची संधी हुकली असती.

महासभेत पहिल्या दिवशी दुपारच्या सत्रात चर्चेला विषय होता तो कन्येच्या विवाहवयाचा. वेगवेगळ्या स्मृतींचा हवाला देत शास्त्रीपंडितांनी त्याबाबत आपापली वेगळी मते पुढे केली. एका पंडितांनी कन्येचा विवाह ८व्या वर्षी झाला पाहिजे म्हटले तर हरचंद्रभट्टाचार्यांनी कन्येचा विवाह दुसऱ्या वर्षी होऊ शकतो असे म्हटले. अनंत कृष्णशास्त्रींच्या मते, मुलगी वयात येण्यापूर्वी लग्न झाले तरी चालेल पण त्यानंतर ती अविवाहित असेल तर तिचा त्याग करावा असे म्हटले. लक्ष्मणशास्त्रींनी त्याला हरकत घेऊन कृष्णशास्त्री त्या गृह्यसूत्राचा अर्थ चुकीचा लावत आहेत असे म्हटले. अनंत कृष्णशास्त्री त्यामुळे त्यांच्यावर फार रागावले. लक्ष्मणशास्त्रींच्या अशा वादातील चकमकी सनातनी पंडितांबरोबर पुनः पुनः घडल्या. अनंत कृष्णशास्त्रींनी देशस्थ, कान्यकुब्ज, सारस्वत वगैरे पोटजातीत विवाह अशक्य असल्याचे सांगून काही शास्त्राधार दिले. त्यावर तर्कतीर्थांनी त्या 'जाती' नव्हेतच, ते आहेत फक्त शाखाविभाग असे सांगितले. पंडित काशिनाथ कर्मकांडी त्या चर्चेच्या अध्यक्षस्थानी होते. त्यांनी तर्कतीर्थांची बाजू उचलून धरली. परंतु, अखेर सनातन्यांच्या दबावाखाली त्यांनी ठरावात फेरफार केला. म्हणजे एका चांगल्या होऊ घातलेल्या उपक्रमाची माती करून टाकली.

त्या आठ दिवसाच्या अधिवेशनात तर्कतीर्थांना प्रकर्षाने जाणवले की, पंडित ग्रंथाधार देतात खरे परंतु, ते फक्त त्यांना सोयिस्कर असलेले. शास्त्रवचन न बदलता, बदलत्या काळात त्याचा अन्वयार्थ कसा काढावा हे केवलानंदांकडून ते शिकले होते.

सामाजिक अभिसरणासाठी धर्मवचने वेगळ्या प्रकारे लावली गेली पाहिजेत हे त्यांनी जाणले होते. अशा परिषदांमधील व्युत्पन्न पंडितांच्या मनोवृत्तीने ते निराश झाले नाहीत. समाजसुधारणेचे प्रयत्न करणारे सुरवातीला बहुधा एकांडे शिलेदार ठरतात. त्या अधिवेशनाला जमलेल्या प्रत्येक पंडिताचा अधिकार मोठा होता. प्रत्येकाच्या नावाला मोठे वजन होते. परंपरांना चिकटून रहाणाऱ्यांची जिद्द आणि त्यांच्या विरोधात सुधारणांचा आग्रह धरणाऱ्यांचा निग्रह यातील चुरस अशा अनेक धर्मसभांत दिसून आली. तर्कतीर्थ युक्तिवादाने समर्थन करण्यात कधी कमी पडले नाहीत. अग्रगण्य पंडितांमध्ये शास्त्रार्थ करण्यास ते नेहमी तत्पर होते. अशा धार्मिक व सामाजिक आंदोलनात ते समरसतेने मिसळून गेले.

तर्कतीर्थांनी केवलानंदांकडून घेतलेले हे समाजसुधारणेचे व्रत होते. सामाजिक निर्बंध अनेकवेळा धर्मग्रंथातील वर्तन नियमनावर अवलंबिलेले दिसत नव्हते. ते केवळ सामाजिक प्रथांच्या स्वरुपात चालत राहिलेले होते. अभ्यास, वाचन अध्यापन, लेखन आणि व्याख्याने हा त्यांचा जीवनक्रम होता. समाजपरिवर्तनासाठी लोकमानस तयार करणे ही त्यांनी आपली जबाबदारी मानली. त्यासाठी कितीही प्रवास करावा लागला तो त्यांनी केला. प्रवासाने कधीही त्यांना दमणूक वाटली नाही. लोकांमध्ये मिसळणे, विद्वान अभ्यासू लोकांबरोबर चर्चा करणे, आपली मते आणि विचार पुन: पुन: पारखून घेणे ही त्यांची बौद्धिक शिस्त होती. ती त्यांना प्रबोधनातून मिळाली होती.

परंपरागत धर्मश्रद्धेतून येथील समाजाला बाहेर काढण्याचे काम सुरु झाले होते. तर्कतीर्थ एकटेच ते करत नव्हते तर अनेक समविचारी त्यांच्या भोवती जमले होते. धार्मिक मूल्यांपलिकडील अशा मूल्याची त्यामुळे जाणीव होऊ लागली होती. ते होते माणसाचे मौलिक स्वातंत्र्य, अशा स्वातंत्र्याची बैठक माणसात वसत असलेली विवेकबुद्धी ही होती.

प्राज्ञपाठशाळेतील वैचारिकतेचे एक महत्त्वाचे अंग म्हणजे धर्मचिकित्सा. हिंदु धर्माच्या नावाखाली जे जे विचार, तत्त्वज्ञान आणि आचारविचार होते त्याची मिमांसा सुरु झाली होती. अशा वेगवेगळ्या उपपत्ती स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ, योगी अरविंद यांनी केली होती. त्यांच्या नव्या उपपत्तीत आध्यात्मिक बाजूवर अधिक भर होता. भारतीय समाजाला फार मोठी गरज होती ती ऐहिक प्रगतीची. नित्याचे व्यावहारिक जीवन यशस्वीपणे जगण्याची. माणूस म्हणून होणारी प्रगती हे नवे मूल्य स्थापन करण्याची. रूढ मूल्ये, सामाजिक प्रथा, धर्माच्या रुढी, आत्तापर्यंतच्या समाजसंस्था या सर्वांची चिकित्सा करण्याची निकड निर्माण झाली होती. वेगवेगळ्या

पीठांच्या शंकराचार्यांबरोबर त्याबद्दल तर्कतीर्थांचे वाद चालू होते. मार्क्सने सुचविल्याप्रमाणे सर्व चिकित्सेची सुरुवात धर्माच्या चिकित्सेने होते. हिंदुधर्माची चिकित्सा करण्यास तर्कतीर्थ नेहमी पुढे राहिले.

पं. मदनमोहन मालवीय म. गांधींचे चाहते आणि शिष्य देखील. त्यांनी १९२९ मध्ये अलाहाबादला एक सनातनंधर्म परिषद भरविली. समाजात लहानसहान सुधारणा करण्याची त्यांची तयारी होती पण अस्पृश्यता निवारण्यात मात्र त्यांचा पुढाकार नव्हता. अस्पृश्यांना श्रृतीचा अधिकार परंपरेने नाकारला होता. तेव्हां 'नम: शिवाय' हे त्यांनी म्हणता कामा नये असे सनातनी धर्ममार्तंडांचे म्हणणे होते. मात्र त्याऐवजी 'शिवाय नम:' असे अस्पृश्यांनी म्हणण्यास हरकत नाही कारण श्रुतीत ती ओळ नाही अशा विषयावर त्या परिषदेत वाद झडला. पं. मालवीयांनी तर्कतीर्थांकडे त्या दोन्हीपैकी अस्पृश्यांनी कोणता मंत्र म्हणणे योग्य ठरेल अशी तारेने विचारणा केली. तर्कतीर्थांनी तारेने उत्तर पाठविले की, कशाही प्रकारे म्हटले तरी त्याचा अर्थ एकच तेव्हां काहीही म्हणावे.

तर्कतीर्थांच्या जीवनात या संबंधात काही मजेशीर प्रसंग येत असत.

स्वत:च्या धर्माकडे बघण्याची वस्तुनिष्ठ दृष्टी ठेवण्यासाठी इतर धर्माची ओळख हवी. त्यांचा अभ्यास असणे जरूर असते. लक्ष्मणशास्त्री एकदा कलकत्त्याचा प्रवास करत होते. मोगलसराई स्टेशनवर त्यांच्या डब्यात वाडीकरशास्त्री म्हणजेच संकेश्वर मठाच्या तेव्हाच्या शंकराचार्यांचे बंधु चढले. त्यांच्याबरोबर माधवशास्त्री भंडारी व द्रविडही होते. आता हे पंडित एकत्र आले की, त्यांची बोलणी हिंदुधर्माबाबत सुरू होणे हे देखील स्वाभाविक होते. शिवाय या गप्पा आता दोन वेगळ्या भूमिकेतून चालू रहाणार हेही तितकेच खरे! वाडीकरशास्त्रींनी तेव्हा ख्रिश्चन धर्मात, हिंदुधर्मात जी वेगळी दृष्टी दिसते तशी नसल्याचे म्हटले. त्यांचे म्हणणे होते जगाची उत्पत्ती, स्वरूप, जीवनपद्धती यावर त्या धर्मात भाष्य नाही. तर्कतीर्थांनी बायबल नीट तऱ्हेने वाचले होते. त्यामुळे त्यातील काही उताऱ्यांचा उल्लेख करून त्यांनी म्हटले की, त्यांचे म्हणणे बरोबर नाही. माधवशास्त्री आणि द्रविड यांनी अशीही पुस्ती जोडली की, इतरधर्मीय हे भोगयोनी असून हिंदू तेवढे धर्मयोनी आहेत. तर्कतीर्थांनी हेही म्हणणे खोडून काढले. याप्रसंगानंतर तर एक मजेदार घटना घडली. त्या शास्त्रीपंडितांनी केवलानंद सरस्वतींना एक पत्र पाठवून कळवले की, 'काशीला शिकून आलेला तुमचा शिष्य ख्रिस्ती धर्माची फार तरफदारी करतो. बहुधा तो ख्रिस्ती धर्म स्वीकारणार.' केवलानंदांनी त्यावर सावधपणे तर्कतीर्थांच्या वडिलांना तशी माहिती

दिली. त्यावर त्यांच्या बाबांनी त्यांना कलकत्त्याला पत्र पाठवून म्हटले की, खानदेशकडे उन्हाळा तसा कडक त्यामुळे पुढील उन्हाळ्यात ते वाईला येऊन राहतील. तर्कतीर्थ कलकत्त्याहून परतल्यावर त्यांनी प्रथम कृष्णेत अंघोळ केली व ते गंध-भस्म लावून गुरूंच्या पाया पडण्यास गेले. आता कसचा संशय आणि कसचे काय!

आपली सुधारणावादी मते तर्कतीर्थ सर्व सभांत आग्रहाने रेटत होते. त्यांच्या घरातील वातावरण सुधारणांसाठी केव्हाच तयार झाले होते. सोवळ्याओवळ्याचे संस्कार त्या घराला माहीत नव्हते. पवित्रापवित्रतेच्या कल्पनांना तेथे थारा नव्हता. श्राद्धपक्ष, वार्षिक सत्यनारायण, एकादशी, शिवरात्र असे दिवस तेथे पाळले गेले नाहीत. अर्थात अशा विशेष दिवशीचे फराळाचे जिन्नस रुचिपालट म्हणून घरी अनेकवेळा तयार होत. तर्कतीर्थांच्या पत्नीच्या माहेरघरी रामानंद भक्तिसंप्रदाय होता. त्यामुळे पूजा, भजन, आरती, कीर्तन यांच्या नादाने घर गुणगुणत असे. तरी तर्कतीर्थांबरोबर संसार करताना त्या कोणत्याच गोष्टीची त्यांना आठवण आली नाही. संस्थेला भेट देण्याऱ्यांची विचारपूस, चहापाणी, जेवणखाण या सर्वांची त्या स्वत: व्यवस्था करीत. तर्कतीर्थांचे स्वातंत्र्य लढ्यातील काही स्नेही, पुंडलिकजी कातगडे, हरिभाऊ मोहनी, बाबा फाटक महिनान् महिना मुक्कामाला असत. परंतु त्यांच्या खाजगी आणि सार्वजनिक जीवनात कधी ताण आला नाही. सर्व पाहुण्यांची जेवणे घरात, स्वयंपाकघरात होत.

तर्कतीर्थ वाईला असत तेव्हां आपल्या मुलांच्या प्रत्येक गोष्टीत त्यांना रस असे. त्यांची मुले मधुकर, सुमन, मालती आणि वासुदेव त्यांच्या येण्याकडे डोळे लावून वाट पहात. कारण प्रवासाहून येताना त्या त्या प्रांतातील फळे, मेवा ते आणत. मुलांसाठी गोष्टींची पुस्तके घेऊन येत. शिवाय रोज संध्याकाळी दिवेलागणीला त्यांच्याभोवती कोंडाळे करून बसल्यावर त्यांच्याकडून मुलांना पुराणातील, ग्रीक साहित्यातील गोष्टी ऐकावयास मिळत. त्यांनी सांगितलेल्या गोष्टी अनेकवेळा कोणत्याही पुस्तकात नसत. परीक्षा कधी आहे, मार्क किती पडले किंवा अभ्यास नीट चालला आहे किंवा नाही असे अवघड प्रश्न त्यांनी कधीही विचारले नाहीत. मुले नीट वाढत आहेत यावर त्यांचे बारीक लक्ष असे. कोठे खोकला किंवा ताप मुलांच्या अंगात आहे असे वाटल्यास लगेच आयुर्वेदीय भस्मे, काढे मुलांच्या पुढे करीत. 'हो', 'नाही' म्हणण्यास ते अवसरच देत नसत. चमचा पुढे करून तोंड उघडण्यास सांगत आणि दुसऱ्या हाताने पाण्याचे भांडे पुढे करीत असत. कधीकधी ते दुसऱ्या प्रदेशातील फुलझाडांचे कंद,

बियाणे घेऊन येत. दौरा नसे तेव्हां पाठीमागच्या अंगणात ते खणून, वाफे तयार करीत व नवी रोपे लावत. योग्यवेळी फुले बहरली की, ते फुलांचे तेवढेच कौतुक करीत.

१९३४ मध्ये केवलानंदांनी तर्कतीर्थांबरोबर एक आगळावेगळा 'धर्मकोशा'चा प्रकल्प आखला. अतिशय महत्त्वाकांक्षी अशा या कोशाची रचना ऐतिहासिक पद्धतीने होणार होती. प्राचीन धर्मशास्त्रांपासून १८व्या शतकापर्यंत धार्मिक आचाराची सूत्रे आणि त्यावरील भाष्ये संग्रहीत करण्याचे ते काम अनेक वर्षे अनेक शास्त्रीपंडितांच्या मदतीने होणार होते. त्यावर सल्लागार म्हणून म.म.पां.वा. काणे, के. ल. दप्तरी, न. र. फाटक, श्री. शं. नवरे यांसारखी मंडळी होती. सुरवातीला त्यासाठी लागणारा छापखाना पुण्यात असल्यामुळे तर्कतीर्थांनी तीन-चार वर्षे पुण्यात बिऱ्हाड केले. पुण्याच्या त्या घरात अनेक प्राध्यापक, लेखक, साहित्यिक, वक्ते यांचा राबता होता. प्र. के. अत्रे अनेकवेळा तर्कतीर्थांच्या भेटीला येत राहिले. त्यांनी काढलेल्या 'ब्रँडीची बाटली' या बोलपटावर पुण्यातील अनेक सनातनी शास्त्री बिथरले होते. कारण त्यात कृष्णाच्या सोळा सहस्त्र बायकांचा उल्लेख होता. त्यावर काही थट्टामस्करी उडवली होती. श्री. म. माटे, कृष्णराव मराठे वगैरेंनी अत्र्यांचा निषेध करण्यासाठी सभा बोलाविली. तेव्हां पुरोगामी गटाकडून अत्र्यांना समर्थन देण्यासाठी तर्कतीर्थ उभे राहिले. काकासाहेब गाडगीळ, काकासाहेब लिमये, धुंडिराजशास्त्री विनोद, सिनेमासंबंधित अनेक मान्यवर त्या सभेत होते. तर्कतीर्थांनी भावनेच्या काहुरावर त्याबाबत निर्णय न करता बुद्धीवर केला जावा असे म्हटले. त्यांनी महाभारतातील कृष्ण रसिक वृत्तीचा आहे असे सांगून शृंगाररसाचे जीवनात किती महत्त्व आहे हे सभेत मांडले. इतकेच नव्हे तर कृष्णाची त्या सिनेमातील तशा उल्लेखाने बदनामी होत नाही, उलट तो जसा आहे, ते सांगितले पाहिजे, ते दडपण्याने मात्र हास्यास्पद ठरते. असा त्यांच्या भाषणाचा आशय होता. त्यांच्या भाषणाला सभेने टाळ्यांच्या गजरात उचलून धरले.

पुणे शहर त्याकाळी वादग्रस्त विषयावर सभांचे आयोजन करण्यात फार अग्रेसर होते. तर्कतीर्थांच्या तेथील मुक्कामात रोमहर्षक असे काही ना काही सारखे घडत होते. वाई येथे धर्मकोशाच्या छपाईसाठी प्रेस उभारला गेला आणि तर्कतीर्थ पुन: वाईत परतले. हिंदुधर्मावरील एक अधिकारी म्हणून त्यांचे नाव भारतभर झाले होते. 'हिंदुधर्माची समीक्षा' हे त्यांचे पुस्तक १९४१ मध्ये प्रसिद्ध झाले. मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा त्यांच्यावर तेव्हा खोलवर प्रभाव होता. त्यामुळे हिंदुधर्माचे समीक्षण सत्य पण कठोर होते, त्यावर पुढे काही वर्षे जोरदार टीका होत राहिली. काहींनी त्यांचा

उल्लेख 'भाई लक्ष्मणशास्त्री' असा केला. काही सनातनी विद्वानांनी म्हटले 'आज शास्त्रीबोवांना हिंदुधर्मापेक्षा मुसलमान व ख्रिस्ती धर्म जवळचे वाटतात, इतके असूनही ख्रिस्ती पाद्र्यांकडून त्यांच्या मस्तकावर उदकसिंचन झाल्याखेरीज त्यांना ख्रिस्ती स्वर्गाची दारे बंद आहेत हे त्यांनी विसरू नये.' अशी कडवट प्रतिक्रिया व्यक्त केली. या मतमतांतरात डॉ. आंबेडकरांना मात्र तर्कतीर्थांचे कौतुक वाटत राहिले. त्या दोघांची पहिली भेट हिंदु कॉलनीतील आंबेडकरांच्या घरी झाली. आंबेडकरांनी तेव्हा तर्कतीर्थांकडे एक खंत बोलून दाखविली. ती होती, त्यांनी वेद, स्मृतिग्रंथ कधी मूळात वाचली नाहीत. कारण ते संस्कृत शिकले नाहीत. त्यांना भाषांतरावर अवलंबावे लागले. तर्कतीर्थांकडे त्यांनी त्यांची 'मनुस्मृति' जाळण्याच्या कृतीबद्दल काय प्रतिक्रिया होती याबद्दल विचारले. तर्कतीर्थ तेव्हा म्हणाले की, एखादे पुस्तक जाळण्याने त्यातील विचार जळत नाहीत हे बाबासाहेब जाणत होतेच, परंतु सामाजिक प्रगतीत मनुस्मृति अडचण ठरली म्हणून तसे करणे केवळ प्रतिकात्मक होते. तर्कतीर्थांनी वाई सोडली की, पुढील सर्व प्रवास बहुधा रेल्वेने करीत. अशा प्रवासात त्यांचे निवांत वाचन व मनन होत असे. त्यांनी वैदिक संस्कृतीचा विकास हा ५०० पानांचा ग्रंथ चार-पाच महिन्यात सांगून संपविला. त्यांचा लेखनिक राम कोल्हटकर, त्याचे हस्ताक्षर व शुद्धलेखन छान होते. हातात काही टिपणे घेऊन तर्कतीर्थ मजकूर सांगत व कोल्हटकर तो टिपत असे. त्यावर नजर टाकून कोठे काही सुधारणा झाल्या की, वाईच्या प्रेसमध्ये तो छापायला गेला.

तर्कतीर्थांच्या घरी श्रीमंती थाट असण्याचे कारण नव्हते. परंतु प्रसन्न स्वागतशील वातावरणात भेटीला आलेले पाहुणे लवकरच सैलावत. चहापाणी, गप्पा-चर्चा यात काही वेळ घालवून आलेली मंडळी परत जावयास निघत.



# म. गांधींची भेट आणि राजकीय जीवनाची सुरुवात

साल १९२८. तर्कतीर्थ जळगावमार्गे कलकत्याच्या प्रवासात होते. वाटेत बार्डोली स्टेशन लागते. तेथे गाडी थांबली तेव्हा स्टेशनचा परिसर लोकांनी फुलून गेला होता. काय गडबड आहे ते पाहण्यासाठी तर्कतीर्थ खाली उतरले. त्यांना तेव्हा कळले की, साराबंदी निमित्ताने शेतकऱ्यांचा सत्याग्रह सुरू झालेला होता, त्याची ती गर्दी... त्याच सुमारास चौरीचौरा सत्याग्रहाला हिंसक वळण लागले म्हणून गांधीजींनी उपोषण सुरू केले होते ते त्यांचे प्रायश्चित होते. गांधीजींचा मुक्काम तेथेच जवळपास एका आश्रमात होता. तर्कतीर्थांना गांधींना भेटण्याची जबरदस्त इच्छा होती. त्यांनी पुढील प्रवासाचा बेत रद्द केला आणि गांधींच्या आश्रमाच्या दिशेने त्यांची पावले वळली. ते प्रथम गांधीच्या निकट असणाऱ्या मगनभाईंना भेटले आणि तेथे राहण्यासाठी त्यांनी परवानगी मिळविली. दुसऱ्या दिवशी पहाटेच्या प्रार्थनासभेत मगनभाईंनी तर्कतीर्थांना काही वेदपठण करण्याची विनंती केली. तेव्हा त्यांनी कठोपनिषदातील काही भाग म्हटला. गांधी ते ऐकून खूप आनंदित झाले व त्यांनी या शास्त्रींची गाठ घेऊ या असे मगनभाईंना म्हटले. त्याप्रमाणे त्या दोघांची ही पहिली भेट झाली. त्यांचे थोडेफार काही बोलणे झाल्यावर गांधी म्हणाले, ''कशाला पुढे शिकता आहात? राहून जा इथे.'' तेव्हा तर्कतीर्थ तेथे दोन महिने राहिले. त्यानंतर गांधींना त्याठिकाणी पुन: अटक झाल्यावर तर्कतीर्थांनीही आश्रम सोडला.

लोणावळ्याच्या कैवल्यधामात १९२९ मध्ये तर्कतीर्थ दर्शने शिकविण्यासाठी रुजू झाले. पाचसहा महिने तेथे ते शिकवत होते पण गांधींशी जी भेट घडली होती तिच्यामुळे त्यांच्या मनात अस्वस्थता आली होती. शिकणे-शिकविणे यात त्यांचे मन रमेना. ते वाईला परतले. त्यांनी आपले सहाध्यायी शं. वि. लेले, शंकरराव जोशी, मधुकर साठे आणि भय्याशास्त्री वाटवे यांना त्यांनी बरोबर घेतले. गांधीच्या

व्यक्तिमत्वाने ते सर्व भारलेले होते. ते काँग्रेसच्या प्रचारासाठी बाहेर पडले. पहिला दौरा कऱ्हाडकडे होता. त्या भागात एका आठवड्यात त्यांनी आठ-दहा व्याख्याने दिली. कऱ्हाड हे यशवंतराव चव्हाणांचे गाव. त्यावेळी चव्हाणांची शाळेची अखेरची एक-दोन वर्षे होती. तरी अभ्यास टाकून यशवंतराव तर्कतीर्थांच्या व्याख्यानांना हजर राहिले. ते वाईच्या त्या विद्वानाच्या 'प्रखर बुद्धिमत्तेच्या तेजाने प्रभावित झाले.' तर्कतीर्थांच्या भाषणांना फार गर्दी होत होती. ते एका झंझावातासारखे व्याख्याने देत फिरत होते. विशेषत: तरुण वर्गावर त्यांच्या विचाराची पकड होती. त्यांनी केलेली पारतंत्र्याची मीमांसा आणि देशभक्तीची धार यामुळे जमणाऱ्या लोकांवर चांगला प्रभाव पडला. तिकडून ते नगर जिल्ह्यातील संगमनेर येथील शिबिरात गेले. तेथील गोरक्षण संस्थेच्या विस्तृत आवारात शिबिरार्थी जमले होते. देशभक्तिपर कवने, प्रार्थनासभा आणि भाषणे असा कार्यक्रम चालू होता. रामकृष्णदास नावाच्या सत्याग्रहीने संपन्न मारवाडी समाजाकडून त्यासाठी आर्थिक मदत मिळविली होती. ते शिबीर तेवढ्यात बेकायदा असल्याचे तेथील दंडाधिकाऱ्यांनी जाहीर केले. मग सत्याग्रहींची धरपकड सुरु झाली. तर्कतीर्थ तेथून निसटले. ते नाशिक जिल्ह्यातील कळवण येथे कायदेभंगाच्या चळवळीचे महत्त्व पटविण्यासाठी भाषणे देत राहिले. त्यांच्याबरोबर गणपतराव आळतेकर होते. अखेर रात्री दहाच्या सुमारास सत्याग्रहींसमोर भाषण करणाऱ्या तर्कतीर्थांना अटक झाली. हा त्यांचा पहिला कारावास. १९३० सालातील आणि तो सहा महिने होता.

तर्कतीर्थांना कारागृहात श्री. चिक्केरुर, श्री. मेहेरअली भेटले. ते दोघे यूथ काँग्रेसशी संबंधित होते. त्यांनी तर्कतीर्थांची कारागृहात, त्याआधीच बंदिस्त केलेल्या द्वा. भ. कर्णिकांशी भेट घडवून आणली. कर्णिकांनी कार्ल मार्क्सचे लिखाण पूर्वी वाचले होते. त्यांच्यामुळे लक्ष्मणशास्त्रींनी मार्क्सच्या समाजक्रांतीचे तत्वज्ञान वाचून काढले. तुरुंगात असलेल्या सत्याग्रहींपर्यंत त्यांना पाहिजे ते साहित्य येत असे. त्यामुळे या सर्व कार्यकर्त्यांची अनेक विषयांवर चर्चा होई, तशा मार्क्सवादावरही होत राहिल्या. तर्कतीर्थांनी मार्क्सचे 'कॅपिटल', 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' बरोबर, एंगल्स, फायरबाख यांचेही लिखाण वाचले. तुरुंगात रॉय यांचे निबंध गुप्त रीतीने येत असत. म्हणजे, गांधींच्या नैतिक लढ्याच्या आकर्षणामुळे तुरुंगात अडकल्यावर काहिशी विरोधी तत्वप्रणाली त्यांच्यापुढे येऊन ठाकली. मार्क्सवादी चळवळीला या देशात जोम येण्याचा तो काळ होता. त्यामुळे मार्क्सवाद समजणे जरुरीचे होऊन बसले.

गांधीजींच्या, सरकार बरोबर चाललेल्या वाटाघाटी १९३१ साली फिसकटल्या,

तेव्हा कायदेभंगाची चळवळ सुरू झाली. तर्कतीर्थ त्याही चळवळीत भाग घेऊ लागले. १९३२ च्या त्या आंदोलनात झालेल्या धरपकडीत त्यांना धुळ्याच्या जेलमध्ये पाठविण्यात आले. ते तेथे तब्बळ नऊ महिने होते. काँग्रेसच्या अनेक वरिष्ठ नेत्यांना त्या ठिकाणी ठेवले होते. विनोबा भावे, गुलझारीलाल नंदा, जमनालाल बजाज, पुरुषोत्तमदास त्रिकम या मंडळींबरोबर तर्कतीर्थांच्या नियमित गाठी पडत. कलकत्याचे माधवजी शेठ तर्कतीर्थांकडून उपनिषदे शिकू लागले. विनोबा तर कधी जमनालाल ते ऐकायला थांबत. तर्कतीर्थ उपनिषदांची मांडणी व अर्थ अगदी वेगळ्या प्रकारे मांडत होते. माधवजी तर्कतीर्थांकडून उपनिषदे शिकू लागले ते त्यातील शब्दन्‌शब्द समजावून घेत. त्यांना गोषवारा नको होता. उपनिषदांचा अर्थ आता काळाच्या संदर्भात, अतिशय वेगळ्या प्रकारे लावण्यास तर्कतीर्थांनी सुरुवात केली. ती शास्त्रव्युत्पत्ती ऐकून विनोबा देखील खूष झाले. छांदोग्योपनिषदातील प्राणाग्नीहोत्राचे विवेचन तर्कतीर्थांनी केले. त्यानुसार उर्वरित अन्न चांडालाला देणे हे अग्निहोत्रच असल्याचे त्यांनी म्हटले. माधवजींना हे चटदिशी पटले. त्यांनी तर्कतीर्थांच्या भाष्यावरील टिपणे काढली होती. माधवजींनी काढलेली टिपणे जमनालाल यांच्या पहाण्यात आली. त्यांनी तर्कतीर्थांना अस्पृश्यतेबद्दल शास्त्रवचने कशी लावता येतील अशी विचारणा केली. जमनालाल तर्कतीर्थांच्या निरुपणावर फार खूष झाले आणि म्हणाले, एकदा त्यांनी पुन्हा गांधीजींना भेटावे, ते कसे जमवायचे हे ते ठरवतील. मार्चपासून नोव्हेंबरपर्यंत तर्कतीर्थ जेलमध्ये होते.

गांधींनी १९३२ मध्ये पुन: उपोषण सुरु केले ते अस्पृश्यतेच्या प्रश्नावर. त्यांचे आणि आंबेडकरांचे 'कम्युनल ॲवॉर्ड' वर मतभेद झाले. गांधींनी तुरुंगातून अस्पृश्यता निवारण्याच्या चळवळीचा एक भाग म्हणून 'हरिजन' आणि 'यंग इंडिया' अशी हिंदी व इंग्रजी साप्ताहिके सुरू केली. १९३३ साली येरवड्याच्या तुरुंगात गांधींना ठेवले होते. ते अस्पृश्यतेच्या प्रश्नावर फार बेचैन होते. तेव्हां जमनालाल बजाजांनी तर्कतीर्थांनी गांधीजींची भेट घ्यावी असा निरोप धुंडिराजशास्त्री देवांबरोबर दिला. गांधींना परंपरावादी आणि परिवर्तनवादी अशा दोन्ही बाजूंच्या विद्वानांची अस्पृश्यतेवर मते समजावून घ्यावयाची होती. गांधींनी तर्कतीर्थांबरोबर त्यांचे गुरू केवलानंद सरस्वतींनाही येरवडा येथील जेलमध्ये भेटीसाठी बोलावून घेतले. नागपूरचे के. ल. दप्तरी, सिध्देश्वरशास्त्री चित्रा व पाठकशास्त्री, बाबू भगवानदास जेलमध्ये गांधींना भेटत राहिले. जुन्या विचारांच्या शास्त्रीवर्गात तर्करत्न भट्टाचार्य होते. नव्याजुन्या विचारांची मंडळी गांधींना भेटून जात तेव्हा गांधींनी तर्कतीर्थांनी रोजच

हजर राहिल्यास बरे असे म्हटले. दोन महिने रोज सकाळी दहा वाजता तर्कतीर्थ गांधीजींच्या बाजूला येऊन बसत. शेवटी दोन्ही बाजूंनी भेटावे आणि महत्त्वाच्या मुद्यावर चर्चा करावी असे, ती ठरवताना कोणते नियम अनुसरावे याबद्दल केवलानंदांना गांधींनी विचारल्यावर त्यांनी तर्कतीर्थांकडे बोट दाखवून ''हा तुम्हाला बरोबर सांगेल, शिवाय सुधारणावादींचे समर्थन काय आहे हेही तोच सांगेल.'' असे म्हटले.

पुराणमतवादी पंडितांचे प्रमुख अनंतकृष्णशास्त्री ठरल्या दिवशी ठरल्यावेळी येरवडा जेलच्या दारापाशी अटींचा कागद घेऊन आले. त्यात 'अस्पृश्यजातियाँ' या शब्दाच्या मागे तर्कतीर्थांनी थोडी भर घातली ती अशी 'आज मानी हुओ अस्पृश्यजातियाँ' तो कागद गांधी स्वत: त्यांच्यासाठी बाहेर घेऊन गेले. त्यांनी हात जोडून त्या विद्वानांना म्हटले 'हे मान्य नसले तरी आत यावे व मला उपदेश करावा.' एका शब्दाची भर घातल्यामुळे सनातनी पंडित रागावून निघून गेले. धर्मसुधारणांना नवमतवाद्यांमध्ये काहीजण पूर्णपणे मान्यता देत नव्हते. त्यांचे म्हणणे होते, रस्ते व शौचकूप सफाई, मृत जनावरांची विल्हेवाट लावणे असली कामे ते करतात त्यामुळे त्यांच्याजवळ जाणे घाण वाटते. तर्कतीर्थांचे म्हणणे होते की, ही कामे तर समाजाला उपयोगी. कोणी तरी ती करावयास हवीच. आपण त्यांना वेशीबाहेर पाठवतो, पुरेसे स्वच्छ पाणी मिळावे हेही पहात नाही. मग ते अस्वच्छ असल्याचा कांगावा करतो. स्मृतींमधील अस्पृशांची केलेली व्याख्या आता कोठेच लागू पडत नसल्याचेही त्यांनी पुराणमतवाद्यांना सांगितले. 'चांडाल' हा शब्द आजच्या कोणत्याही दलित वर्गासाठी वापरला जात नाही. परंतु शेवटी वादाचा निकाल लागला नाही. कारण पुराणमतवादी पूर्वग्रह बाजूला करून विचार करावयास तयार नव्हते. गांधींनी 'हरिजन'मध्ये अस्पृश्यतेवर पंडित काय म्हणतात यावरचे पत्रक जाहीर केले. त्यावर पहिली सही केवलानंद सरस्वतींची. लक्ष्मणशास्त्री जोशी, भगवानदास, आनंदशंकर ध्रुव, इंदिरारमण शास्त्री, के. ल. दप्तरी आणि पुरंदरे इत्यादी सहा जणांच्या सह्या पाठोपाठ आहेत. ते पत्रक ११ फेब्रुवारी १९३३ चे.

अस्पृश्यांच्या प्रश्नांवर वादविवाद चालू झाले त्यात एक त्यांच्या मंदिरप्रवेशावर होता. तसे 'हरिजन'मध्ये त्याबद्दल काही ना काही येतच होते. पुण्याच्या शिवाजी मंदिरात सनातनी व पुरोगामींची एका संध्याकाळी वादसभा झाली. देवनायकाचार्य व राजराजेश्वरशास्त्री यांनी उत्तम संस्कृतमधून युक्तिवाद करत, अस्पृश्यांना मंदिरप्रवेश करण्यास शास्त्र परवानगी देत नाही असे घोषित केले. तेव्हा लक्ष्मणशास्त्रींनी आपल्या

भाषणाची सुरवात ''मै हूँ लछमनशास्त्री जोशी.... मेरा कहना है, मंदिर सर्व भक्तोंके लिए खुला है। हिंदुधर्मशास्त्र किसीको मंदिरमे जानेसे रोकता नही।'' अशी केली. त्यांनी त्यांच्या मुद्याला पोषक असे अनेक आधार शास्त्रांमधून काढून दिले. त्यांच्या भाषणाची सभेकडून जोरदार टाळ्यांनी समाप्ती झाली.

गांधींचे उपोषण संपण्यापूर्वी सरकारने त्यांना येरवडा जेलमधून सोडले. तेव्हां ते प्रमिलाबाई ठाकरसींच्या पर्णकुटीवर बरेच दिवस राहिले. राजगोपालाचारींची तेव्हां गांधींनी लक्ष्मणशास्त्रींशी ओळख करून दिली. गांधींच्या पर्णकुटीतील वास्तव्यात लक्ष्मणशास्त्री पुण्यातच राहिले होते. जवळजवळ रोजच गांधी हिंदुधर्माबद्दल त्यांच्या शंका त्यांना विचारत, एकदा गांधींनी 'माझा मुलगा देवदास व राजगोपालाचारींची कन्या लक्ष्मी' यांचा विवाह शास्त्रानुसार होऊ शकेल का असे लक्ष्मणशास्त्रींना विचारले. गांधी हे वर्णाने वैश्य तर राजगोपालाचारी तमिळ ब्राह्मण म्हणजेच हा मिश्र वर्णांमधील विवाह धर्मसंस्कारांनी होऊ शकतो हे त्यांना हवे होते. इतर व्युत्पन्न पंडितांनी तो 'अधर्म' असल्यामुळे विवाह लावण्याचे नाकारले होते. लक्ष्मणशास्त्रींनी गांधींची मूल्ये, आचार राजगोपालाचारींप्रमाणेच आहेत त्यामुळे वर्ण देखील समान असल्याचे मानावे लागेल असे सांगितले. ''तो विवाह तुम्ही लावाल का?'' असे गांधींनी त्यांना विचारले. त्यांनी 'हो' म्हटले.

लक्ष्मी-देवदास यांचा विवाह १६ जून १९३३ मध्ये पर्णकुटीत लागला. त्याचे पौरोहित्य लक्ष्मणशास्त्रींनी केले. सत्यवतीबाई त्यांच्या मागे लागल्या होत्या की, 'मला एकदा गांधींचे दर्शन घडवा.' त्या या समारंभात हजर होत्या. कस्तुरबांच्या बाजूला त्या बसल्या होत्या. त्या गांधींना भेटल्यावर त्यांच्या पाया पडल्या आणि आपल्या बोटात असलेली सोन्याची अंगठी, म्हणजे त्यांचा एकमेव मूल्यवान दागिना त्यांनी गांधींना अर्पण केला. त्या समारंभाला देशभरातील महत्त्वाची प्रतिष्ठित मंडळी हजर होती. त्या समारंभाचे वृत्त, लक्ष्मणशास्त्रींचा निर्भिड प्रगतिशील विचार हे सर्व दुसऱ्या दिवशी वृत्तपत्रात ठळकपणे प्रसिद्ध झाले. गांधींशी होणाऱ्या भेटी आणि त्या दोघात होणारा विचारविनिमय यामुळे लक्ष्मणशास्त्री स्वत:ला भाग्यवान समजत होते. त्यांच्या जन्मगावी मात्र लोक त्यांच्यावर रागावून होते. आपल्या लहानपणच्या गावी ते जात तेव्हां त्यांना पहिल्यासारखी ब्राह्मण घरातील जेवणासाठी निमंत्रणे येणे बंद झाले होते.

१९३४ च्या जानेवारीत, १५ तारखेला दुपारी बिहारमध्ये धरणीकंपाचा प्रचंड धक्का बसला. तो मकर संक्रातीचा काळ. हिंदूंच्या दृष्टीने गंगास्नानाची संधी म्हणजे मोठा पर्वकाळ. हजारो भाविक बाहेरून गंगेच्या किनारी जमले होते. धरणीकंपाने

शेकडो मैल हाहा:कार माजला. घरे कोसळली, झाडे उन्मळून पडली. जमिनीला ठिकठिकाणी २००/३०० फूट खोल चर पडले. हजारो माणसे मृत्युमुखी पडली. त्याच दिवशी संध्याकाळी हे वृत्त रेडिओवर कळले तेव्हां गांधी फार हळहळले. त्यांची यावरील प्रतिक्रिया २ फेब्रुवारीच्या 'हरिजन'मध्ये प्रसिद्ध झाली. ती होती, 'अस्पृश्यतेसारखी प्रथा पाळणाऱ्यांना ही दैवी आपत्ती सोसावी लागते कारण ते महापातक आहे. देवाने ही शिक्षा केली आहे यावरून हिंदूंनी धडा शिकावयास हवा.'

गांधींची ही प्रतिक्रिया वाचून सुशिक्षितांना कमालीचा धक्का बसला. भूकंपावरून रवींद्रनाथ टागोरांचा म. गांधींशी वाद झाला. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी गांधींच्या वरील वक्तव्याच्या संदर्भात 'गांधीगोंधळ' नावाची एक पुस्तिका काढली होती. तर्कतीर्थांनाही गांधींची प्रतिक्रिया अतिशय खेदजनक वाटली. धरणीकंप ही एक नैसर्गिक आपत्ती. त्या घटनेचा संबंध पापपुण्यासारख्या धार्मिक संकल्पनांशी जोडणे हे गैर होते. ईश्वराने हे एक नियमबद्ध जग निर्माण केले असे एकवेळ मानावयास हरकत नाही. परंतु एकदा निर्मिलेल्या जगात ईश्वर पापपुण्याच्या फळांचे वाटप करतांना एवढे घोटाळे करेल हे पटणे कठीण आहे.अस्पृश्यतेसंबंधी ही मीमांसा सदोष होती. गांधींना अस्पृश्यतेची प्रथा समाजातून जावी हे कितीही तळमळीने वाटले तरी ती नाहिशी होण्यास किती काळ लागेल हे कळत नव्हते. आधुनिक जगात यशस्वी व्हावयाचे तर त्यासाठी वैज्ञानिक शिक्षणाची जरुरी होती. त्यावर उपाय होता तो शिक्षण घेण्याचा परंतु गांधी अनेक वेळा 'आतील आवाजावर' भिस्त ठेवत. विवेकावर नाही.

गांधींची अहिंसात्मक लढ्याची सुरुवात, त्याला येत असलेले सुरुवातीचे यश लक्षणीय होते तरीही त्या मार्गाने स्वातंत्र्य मिळविता येईल किंवा नाही याबद्दल काँग्रेसमध्ये अनेकांना शंका वाटत होती. त्यांची समाजमानसावरील पकड आता सैल पडू लागली होती. तर्कतीर्थांचे वर्णजातीवरील विचार धर्मशास्त्रांवर आधारित असूनही अनेक पंडितांना पटत नव्हते. त्यांच्या युक्तिवादाचे सूत्र होते बुध्दीचा निकष. गांधी काहीवेळा वर्णजातीतील अंतर्गत निर्बंधांचे समर्थन मनोनिग्रहावर करीत. स्वजातीत विवाह करणे, कोणाबरोबरही खाणेपिणे नाकारणे याला गांधी इंद्रियांवर संयम ठेवणे म्हणू लागले. सत्याग्रहींनी ब्रह्मचर्यव्रताने रहावे हा विचार आधुनिक शिक्षण मिळालेल्यांना पटण्यासारखा नव्हता. गांधींची आधुनिकता गोंधळात टाकणारी वाटू लागली. बंधनात टाकणाऱ्या सर्व श्रद्धांची तपासणी बुद्धीने केली गेली पाहिजे असे तर्कतीर्थांना वाटले. गांधींच्या विचाराबद्दल त्यांच्या मनात संदेह निर्माण

झाला.

तर्कतीर्थ १९३७ पर्यंत गांधींना मधूनमधून भेटत राहिले. प्रांतिक सरकारे बनवण्याची वेळ आली होती. काँग्रेसच्या प्रचारासाठी शेकडो कार्यकर्ते काम करीत होते तसेच तर्कतीर्थ देखील. काँग्रेसला निवडणुकीत घवघवीत यश मिळाले आणि हुदलीला काँग्रेस कार्यकर्त्यांचा मेळावा भरला. तेव्हां तर्कतीर्थांची त्याठिकाणी एम्.एन्.रॉय यांच्याशी गाठ पडली. त्या दोघांची अनेक प्रश्नांवर चर्चा होऊ लागली. काँग्रेसला निवडणुकीत यश मिळाले तेव्हां असहकारितेचे धोरण आता उपयोगाचे नाही यावर त्यांचे एकमत झाले. तसेच राजेंद्रप्रसाद, वल्लभभाई पटेलांपासून अनेकांना वाटले पण गांधींना अजून ते पटले नव्हते. जागतिक युद्ध १९३९ मध्ये सुरु झाले. ब्रिटीश सरकार फॅसिस्ट आक्रमणाविरुद्ध लढत आहे तेव्हां सरकारबरोबरचे धोरण बदलावे हा विचार देखील गांधींना योग्य वाटत नव्हता. गांधींचा अहिंसावाद लोकशाहीविरुद्ध प्रवृत्तींना विरोध करण्यास तयार नाही असे तर्कतीर्थांना वाटले. अखेर ते गांधी विचार आणि धोरणांपासून दूर झाले. तर्कतीर्थ क्राँग्रेसमधून बाहेर पडले. ही बातमी शंकरराव देवांनी गांधींच्या कानावर घातली. गांधींना त्याबद्दल वाईट वाटले. ते म्हणाले 'मला वाटले होते हे शास्त्री आध्यात्मिक वृत्तीचे आहेत.'

रॉय यांचे राजकीय विचार तर्कतीर्थांना बुद्धीला अधिक प्रामाणिक वाटले. त्यांनी 'रॅडिकल डेमॉक्रॅटिक पक्षा'ची उभारणी केली. स्वातंत्र्यासाठी चालू असलेली चळवळ आता अखेरच्या टप्प्यावर आली होती. तेव्हा स्वराज्य येतच आहे, यापुढे सामाजिक तत्वज्ञान व समाजाची उभारणी कशी असावी याचा विचार करावयास हवा अशी रॉइस्ट नेत्यांची धारणा झाली. स्वातंत्र्य सुरक्षितपणे जपायचे तर समाजबांधणी चांगली हवी. रॉय यांच्या बरोबर ह. रा. महाजनी, वामनराव कुलकर्णी, यशवंतराव चव्हाण, कर्णिक बंधू, न्या. मू. तारकुंडे, गोवर्धन पारीख यांसारखी मंडळी सतत विचारविनिमय करीत होते, त्यांचे विचार जुळले. आधी काँग्रेसमध्ये काम करणारी ही मंडळी रॉयबरोबर नव्या पक्षात शिरली. यशवंतराव चव्हाणांनाही रॉय यांचे विचार आकर्षक वाटले. पण त्यांना काँग्रेसमधून बाहेर पडून या नव्या पक्षात जावे की, नको याबद्दल निर्णय घेणे जमले नाही. 'कृष्णाकाठेत' यशवंतरावांनी म्हटले ''मी वैचारिक त्रिकोणात उभा होतो.... मी त्या त्रिकोणातील जीवन तसेच चालू ठेवले कारण दैनंदिन जीवनात अडचण येत नव्हती.''

तर्कतीर्थांचे राजकीय जीवन गांधीप्रणीत काँग्रेसमधील प्रवेशाने सुरु झाले होते. ते संपले. रॉय यांच्या समवेत उभारल्या गेलेल्या पक्षाला राजकीय कार्यक्रम नव्हता.

त्यांचा भर होता समाजपरिवर्तनावर. मानवतेच्या दृष्टितून व्यक्ती स्वत: स्वत:च्या जीवनाचे निर्णय घेऊ शकेल अशा प्रकारच्या शिक्षणावर त्यांनी भर दिला. त्यांनी मानवविषयक सर्व शास्त्रांमध्ये रस घेतला. आधुनिक समाजशास्त्र, धर्माचे मानसशास्त्र, धर्माचा इतिहास, मानववंशशास्त्र यांच्या अभ्यासातून त्यांची सामाजिक वर्तनांकडे पहाण्याची दृष्टी बदलत गेली. 'हिंदुधर्माच्या समीक्षे'त हिंदुसमाजावरील केलेल्या टीकेची धार बोथट झाली. 'वैदिक संस्कृतीचा विकास' ह्या त्यांच्या ग्रंथात त्यांनी मानवी वर्तनाकडे अधिक व्यापक जाणीवेतून बघितले आहे. त्यांचे नंतरचे म्हणणे होते की, सर्वच धर्मात उच्च, मध्यम आणि कनिष्ठ प्रतीची मूल्ये असतात. आधुनिक विज्ञानपद्धती स्विकारल्यास हिंदी समाज दुरवस्थेतून वर येऊ शकेल.

तर्कतीर्थ काँग्रेसप्रणीत प्रत्यक्ष राजकारणापासून दूर गेले. तरी सामाजिक चळवळीशी त्यांचे संबंध तितकेच अतूट राहिले. त्यांचे हिंदू धर्माचे परिशीलन चालू असताना इतर जागतिक धर्मांचाही त्यांनी अभ्यास केला. मूर्तिपूजा, अंधश्रद्धा, कर्मकांडे यांना विवेकशील जीवनात जागा नाही. त्यांच्यामुळे सामाजिक प्रगतीला खीळ बसते. तरीही त्यांनी १९५१ मध्ये प्रभासपट्टण येथील सोमनाथ मंदिराच्या पुन:स्थापनेची जबाबदारी स्विकारली. त्यामागेही काही घटना कारणीभूत ठरल्या.काका गाडगीळ व वल्लभभाई पटेल जुनागडला गेले होते. तेथून ते प्रभासपट्टणकडे आले. बाजूच्या समुद्राच्या स्वच्छ रेतीवरून चालताना त्यांचे लक्ष सोमनाथच्या पडिक मंदिराकडे गेले. त्यांना वाटले स्वतंत्र भारतात आता त्या मंदिराची उभारणी व्हावयास हवी. जुनागडच्या जामसाहेबांनी त्यासाठी १ लाखाची देणगी दिली, तर सामळदास गांधींनी ५०,००० रु. दिले. त्या भरीव आर्थिक निधीतून आता नव्याने स्थापत्यशास्त्र दृष्ट्या परिपूर्ण, देखणे असे मंदिर बांधले गेले. प्रश्न उरला तो त्या मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचा त्यासाठी काका गाडगीळांनी प्रख्यात संस्कृत पंडितांना त्यातील काही शंकराचार्य पीठातीलही होते. त्याबद्दल विचारले. ह्या मंदिरासाठी नवे विश्वस्तमंडळ नेमण्यात आले. त्यांनी एक अपूर्व निर्णय घेतला. तो असा की, ते मंदिर सर्वच भक्तांना म्हणजे अस्पृश्यांना व अहिंदूंना मोकळे राहील. सनातन पंडितांनी या कारणास्तव प्राणप्रतिष्ठेचे काम नाकारले. दरम्यान जमा झालेला सर्व निधी वल्लभभाईंनी विश्वस्तांकडे सोपवला. त्यादरम्यान वल्लभभाई मात्र निधन पावले.

काका गाडगीळांनी प्राज्ञपाठशाळेकडे, पर्यायाने केवलानंद व लक्ष्मणशास्त्रींकडे त्याबाबत विचारणा केली. मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचा धार्मिक विधी अतिशय दीर्घ व सूक्ष्म कर्मकांडांनी युक्त असतो. त्यात म्हणावयाचे मंत्र, त्यांचे पठण, उच्चार सर्व विशिष्ट

पद्धतीने करावयाचे असतात. स्वत: केवलानंद आणि लक्ष्मणशास्त्रींनी महाराष्ट्र व त्या बाहेरील एकशेसाठ ब्राह्मणमंडळींची त्यासाठी तयारी करून घेतली. पूर्वमीमांसेनुसार हा विधी सतत पाच दिवस चालला. शेकडो-हजारो भाविक त्या धार्मिक सोहळ्यासाठी जमत होते. सर्व ब्राह्मणांना महावस्त्रे, धोरतजोडी, शाल, तांब्याभाडे, दर्भासन, रौप्यपंचक आणि रु. एकशे एकावन्न दक्षिणा दिली. लक्ष्मणशास्त्री प्रमुख आचार्य होते. त्यांच्यापुढे नाण्यांनी भरलेली तबके, काही जडजवाहिर असे दक्षिणेदाखल पुढे केले गेले. त्यांनी तबकांना नमस्कार करून 'शिवस्य' असे म्हणून सोमनाथ ट्रस्टकडे संस्कृत विद्यापीठासाठी, ते सर्व तसेच्या तसे परत केले. एक शाल आणि जाण्यायेण्याचा खर्च तेवढा घेतला.

ते वाईला परतले आणि काही वृत्तपत्रांनी त्यांच्यावर अग्रलेख लिहावयास सुरवात केली. त्यातील काही कौतुकास्पद, तर इतर काहींनी अतिशय बोचक अशी टीका केली. त्यांचे रॉयवादी काही सहकारी देखील रुष्ट झाले. त्यांना वाटले बुद्धिवादी तर्कतीर्थांना मोठे घबाड मिळाले असणार. तर्कतीर्थांनी टीकाटिपणी थांबल्यावर 'केसरीत' एक लेख लिहिला 'सोमनाथची प्रतिष्ठा व निधर्मी राज्य' या मथळ्याखाली. त्यांचे म्हणणे होते की, सर्वसामान्यांना मूर्ती, मंदिरे, पवित्र धार्मिक चिन्हे याचे फार महत्व असते. धर्मवर्तनाचा भोळसटपणा कमी होऊ शकतो तो केवळ चांगले ज्ञान मिळते तेव्हा. इतरेजनांना मूर्तीचा पांगुळगाडा हवा असतो. मूर्तिप्रतिष्ठेचे काम त्यांनी अंगावर घेतले कारण त्यामुळे धर्मसुधारणेचे एक पाऊल पुढे पडणार होते. त्या मंदिरात अस्पृश्यांना प्रवेश होता.

महर्षी शिंदे आणि तर्कतीर्थ यांच्या भेटी झाल्या होत्या. महर्षी शिंदे दलितांच्या उद्धारासाठी, सामाजिक न्यायासाठी झटत होते. ते वाईला येत असत. एकदा वाईची त्यांची सभा संपल्यावर त्या सर्वांची जेवणाची व्यवस्था प्राज्ञपाठशाळेत केली होती. त्याचा निषेध म्हणून दुसऱ्या दिवशी गणपती आळीच्या घाटावर जाहीर सभा घेतली गेली. तर्कतीर्थांवर आक्षेप घेणाऱ्या त्या सर्वांना भाऊरावांनी (शिंदे) सज्जड दम दिला.

प्राज्ञपाठशाळेकडे द्रविडांनी एक मोठा वाडा सुपूर्द केला होता. तेथे तर्कतीर्थांनी म्हणजे व्यवस्थापक मंडळाच्या वतीने दलितांसाठी वसतिगृह सुरु केले. ज्योतिबा फुल्यांवरील तर्कतीर्थांचा एक मोठा निबंध त्या सुमारास सर्वांपर्यंत पोहोचला होता. सामाजिक आंदोलन चालू ठेवणाऱ्या काँग्रेसमधील काही नेत्यांशी, केशवराव जेधे, शंकरराव मोरे, देवगिरीकर, यांच्याशी त्यांचे फार घनिष्ठ संबंध होते. २०व्या शतकातील अनेक प्रकारच्या आंदोलनांनी जातीपातीचे पोलादी निर्बंध थोड्या

प्रमाणात कमी झाले. बौद्ध धर्मालाही ते काढून टाकता आले नाहीत. ३००० जाति-उपजातींच्या जाळ्याने सामाजिक आणि आर्थिक विकास म्हणावा तसा होत नव्हता. परंपरागत मूल्यांची ते पुन: पुन: तपासणी आपल्या लेखात आणि व्याख्यानात करत होते. सामाजिक असमानता आणि त्यामागील धर्मप्रथांची बैठक हा त्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय असे. तर्कतीर्थांनी आपल्या जीवनात कधी विवेकवादाशी तडजोड केली नाही. कोणत्याही एका तत्वप्रणालीशी त्यांनी बांधून घेतले नाही. त्यांच्या विचारसरणीमुळे त्यांचे नाते मानवतेशी बांधले गेले. माणसामाणसांना जोडणारा दुवा ते शोधत होते. माणूस म्हणून जगण्यासाठी प्रत्येकाला हक्क हवा यासाठी त्यांचे लिखाण आणि व्याख्याने चालू राहिली. त्यांच्या सामाजिक कार्याला कोल्हापूरच्या शाहू ट्रस्टच्या वतीने शाहू पुरस्कार देऊन पावती दिली होती.

महर्षी शिंदे हे सामाजिक न्यायासाठी झटणारे. त्यांना या कामाची स्फूर्ती शाहू राजांकडून मिळाली होती. त्यांनी भर दिला तो दलितांना प्रगती करण्यासाठी मदत करण्यावर. असहकाराची राजकीय चळवळ थंडाऊ लागली तेव्हा महर्षी शिंद्यांनी महाराष्ट्राचे लक्ष सामाजिक प्रश्नांकडे वळवण्याचा प्रयत्न केला. भारतीय अस्पृश्यतेच्या प्रश्नावर त्यांनी अभ्यासपूर्ण उत्तम ग्रंथ लिहिला. ते अस्पृश्यांच्या वस्तीत आपल्या मुलाबाळांसह राहू लागले. त्यांना काहींनी म्हटले की, आपण केलेल्या कामाची त्यांना म्हणजे अस्पृश्यांना कोठे कदर आहे, त्यावर त्यांचे म्हणणे होते ''अस्पृश्यतेचा तवा दोन एक हजार वर्षे तरी तरासला आहे, तेव्हा सहानुभूतीचे चार थेंब पोहोचत नाहीत. ते वरच्यावर उडून जातात. त्यांच्या उपयोगी पडूनच पापाचे क्षालन केले पाहिजे.'' तर्कतीर्थांची गाठ शिंद्यांशी प्रथम पडली ती ते गांधींच्या भेटीला येरवड्याच्या तुरुंगात गेले तेव्हा. शिंदे तेथे होतेच. नंतर महर्षी वाईत अनेकवेळा आले. शिंदे, भाऊराव पाटील यांच्याशी तर्कतीर्थांचा प्रत्यक्ष परिचय चांगल्या प्रकारे झाला. त्यांच्या कार्याकडे ते जसे आस्थेने पहात तसे तेही लक्ष्मणशास्त्री या प्रश्नावर कसा विचार करतात इकडे. बहुजन समाजात कार्यरत असणारे आणि काँग्रेस पक्षात प्रतिष्ठा असणारे केशवराव जेधे, मामासाहेब देवगिरीकर, शंकरराव मोरे या सर्वांशी लक्ष्मणशास्त्रींचा वैयक्तिक संबंध जडला. त्यांचा विचारविनिमय होई. तरीही पुढील काळात ब्राह्मणेतर चळवळ चालू राहिली तरी त्याचे स्वरूप मात्र मुख्यत: ब्राह्मणविरोधी असे होऊ लागले.

द्रविडांकडून एक चांगला वाडा प्राज्ञपाठशाळेला मिळाला. तर्कतीर्थांनी त्याचा उपयोग वसतीगृहासाठी करावयाचा ठरविले. वाई तालुक्यात एकमेव महाविद्यालय

सुरू झाले होते. आसपासच्या खेड्यांमधून रोजच यावे लागणाऱ्या दलित विद्यार्थ्यांना तेथे अभ्यासासाठी रहाण्याची विनामूल्य सोय त्यामुळे झाली.

तर्कतीर्थांच्या सामाजिकीकरणाचे स्वरूप सामाजिक परिवर्तनाला आवश्यक अशी तात्त्विक व नैतिक बैठक तयार करणे असे होते. ज्योतिराव फुल्यांच्या कार्याचा मागोवा घेणारा 'ज्योतिनिबंध' त्यांनी लिहिला. डॉ. सुमंत मुरंजन यांच्या 'पुरोहितवर्ग वर्चस्व' आणि 'भारताचा सामाजिक इतिहास' या पुस्तकांना त्यांनी विस्तृत प्रस्तावना लिहिल्या. त्या या संदर्भात महत्त्वाच्या ठरतात. जातिव्यवस्थेची सुरवात, तिचा विस्तार, दुष्परिणाम यामुळे येथील समाजावर झालेले दूरगामी परिणाम याची तर्कतीर्थांनी मीमांसा केली आहे. जातीची ढील आता कोठे कमी होते आहे. आजचा भारतीय समाज ३००० जातिउपजातींच्या जाळ्यात फसल्यासारखा वाटतो. तर्कतीर्थांचे म्हणणे होते की, हिंदी समाज वठलेल्या झाडाप्रमाणे झाल्यामुळे त्याची प्रथम बरीचशी छाटणी करावयास हवी. मग त्याला अर्वाचीन कल्पनांचे खतपाणी घातले तर नवे धुमारे येतील. वरिष्ठ वर्गांना सोयिस्कर म्हणून ही जातिव्यवस्था टिकली. ही जाति समाजातून जाता जात नाही अशी त्यांची टिपणी असे.

जातिबद्ध समाजाची वैगुण्ये दाखवतांना त्यांच्या विवेचनात काही वेगळे मुद्दे डोकावत. त्यातील एक होता बौद्धिक व शारीरिक श्रमांची केलेली दोषपूर्ण विभागणी. त्या श्रमांना पुन: पवित्र व अपवित्र अशा वर्गात गोवले गेले. ब्राह्मण, क्षत्रिय यांच्या कौशल्यांना पवित्र ठरविले गेले तर बांधकाम, सुतारकाम, धातूला आकार देण्याचे काम, सोनारकाम, कातडी साफ करण्याचे काम वगैरे प्रकारची कामे कमी प्रतिष्ठेची ठरविले जाणे हे मोठे चमत्कारिक होते. एक विचित्र गोष्ट म्हणजे जातिनिर्बंध कडक असतानाही वर्णसंकर होत राहिला. या परिस्थितीमुळे धर्मग्रंथ तपासण्याची गरज निर्माण होते असे तर्कतीर्थांना वाटत राहिले. समाजाचा इतिहास तपासणे हे म्हणूनच निकडीचे ठरले. समाजसंस्थांमधील संबंध बदलत गेले. याचा असाही अर्थ होतो की, गरजेनुसार त्यात आजही बदल होऊ शकतात. या प्रकारचे समाजावरील चिंतन त्यांच्या बौद्धिक जीवनाचा भाग होता. त्यांच्या प्रत्यक्ष आचरणात असा भेद कधीच नव्हता. त्यांच्या पत्नीला स्वयंपाकघरात हाताशी मदत करण्यात सावित्री नावाची नवबौद्ध महिला होती. रोज मेणवली गावातून दोन मैल चालून येणारी सावित्री घरातील सर्व कामे चांगली शिकली. इतकेच नाही तर सत्यवतीबाईंच्या निधनानंतर, श्राद्धविधीनंतर सावित्रीला सवाष्णीचे वाण दिले गेले.

✿

# नवमानवतावादी रॉय यांच्या पक्षात प्रवेश

यापुढे तर्कतीर्थांचे राजकीय जीवन आता वेगळ्या वळणावरून निघाले. 'इंडियन नॅशनल काँग्रेसमध्ये' 'लीग ऑफ काँग्रेसमेन' असा एक गट तयार झाला होता. तो काही प्रमाणात मार्क्सवादाने भारलेला होता. तोच गट काँग्रेसमधून रॉय यांच्या नेतृत्वाखाली बाहेर पडला आणि 'रॅडिकल डेमॉक्रेटीक पार्टी' असा नवा पक्ष १९४० मध्ये जन्माला आला. यात गांधींच्या धोरणाबाबत मतभेद असलेले अनेकजण सामील झाले. राजगोपालाचारी व इतर कित्येकांना गांधींना दुसऱ्या महायुद्धाच्या पार्श्वभूमीवर फॅसिझमचा धोका लक्षात कसा येत नाही याबद्दल आश्चर्य वाटले. तरीही स्वातंत्र्यसंग्रामात गांधींबरोबर त्यांचे भावनिक मजबूत बंध निर्माण झाल्यामुळे त्यांनी गांधीबरोबर राहण्याचे ठरविले. गांधी अनेकवेळा मतभेद असलेल्या विचारवंतां-बरोबर चर्चा करीत नसत. सुभाषचंद्रांबरोबर गांधी विचारविनिमय करण्यास तयार नव्हते तेही काँग्रेसमधून बाहेर पडले आणि वेगळ्या मार्गांने पुढे गेले.

रॉयना वाटत राहिले की, दुसरे महायुद्ध टाळण्याचा ब्रिटीश साम्राज्यशाहीने प्रयत्न केला तरी युद्ध सुरू झाले. त्यात निदान फॅसिझमचा पाडाव व्हावयास हवा. उद्या भारत स्वतंत्र होईल, तरी फॅसिझम संपला नाही तर जग सुरक्षित राहणार नाही. त्या युद्धाला सुरुवात झाल्यावर पुण्याच्या शिवाजी मंदिरात रॉय ह्यांनी एक सभा घेतली. फॅसिस्ट युद्धवादी राजवटीच्या विरुद्ध उभे राहण्याचा त्यांचा निर्धार होता. मूलभूत मानवी हक्क सुरक्षित राहतील अशा प्रकारचा आर्थिक, शैक्षणिक कार्यक्रम अमलात आणणे असा रॉय यांच्या पक्षाचा कार्यक्रम असणार होता. त्यांच्या पक्षातील सर्व सदस्यांना सुरुवातीला मार्क्सवादी सामाजिक क्रांतीने प्रभावित केले होते. परंतु मार्क्सच्या साम्यवादाचे प्रत्यक्षात उतरलेले स्वरूप अतिशय विकृत होते. ते बघितल्यावर त्यांचा भ्रमनिरास झाला. त्यामुळे त्यात दोष कसे निर्माण झाले आणि ते भारतीय सामाजिक स्थित्यंतरात कसे टाळावे याचा विचार करण्यासाठी रॉयवादी पक्ष शिबिरे भरवत होता. जीवनाची अंतिम मूल्ये कोणती यावर त्यांच्या पक्षात विचार सुरू

झाला. त्यांनी सामाजिक कार्यक्रमाची नव्याने रुपरेखा आखली. पक्षाचे राजकीय कार्यकर्ते निश्चित केले. त्यात व्ही. बी. कर्णिक, द्वा. भ. कर्णिक, मणिबेन कारा, न्या.मू. तारकुंडे, गोवर्धन पारीख आणि तर्कतीर्थ वगैरे होते.

रॉयना लक्ष्मणशास्त्री आधुनिक विचारसरणीत कितपत पक्के आहेत हे जाणून घ्यावयाचे होते. पाठशाळा पद्धतीत शिकलेले, धर्मग्रंथ चांगले जाणणारे आणि स्मृतिपुराणांचे टीकाकार म्हणून रॉयना ते माहीत होते. तर्कतीर्थांना धर्मग्रंथाचे संपूर्ण प्रामाण्य मान्य नव्हते. याशिवाय ते ग्रंथ ईश्वराने नव्हे तर मानवांनीच तयार केले यावर लक्ष्मणशास्त्रींचे विचार त्यांना माहीत होते. म्हणून त्यातील विचार पुन: पुन: तपासावे लागतात असे त्यांचे म्हणणे होते. तर्कतीर्थांनी रॉयना म्हटले, ''मी मार्क्सवादी असलो तरी त्याचेही विचार तपासत राहतो.'' त्यांनी पूर्वमीमांसेच्या कुमारिल भट्टचा दाखला दिला आणि ईश्वर या जगाचा कर्ता मानल्यास कोणत्या तार्किक अडचणींना तोंड द्यावे लागते हे सांगितले. धर्मशास्त्रात आणि लोकांच्या धार्मिक भावनेत नियमाने राहणारा ईश्वर तर्काने नव्हे तर श्रद्धेच्या बळावरच मानता येतो असेही सांगितले. साम्यवादावरील दोघांचे विवेचन एकच होते. रॉयनी आपल्या आंतरवर्तुळात लक्ष्मणशास्त्रींना फार जवळचे स्थान दिले.

रॅडिकल डेमॉक्रेटिक पक्षाने कामगार व शेतमजुरांच्या प्रश्नांकडे प्रथम लक्ष द्यावयाचे ठरविले. त्या पक्षाच्या प्रांतीय शाखा उघडल्या गेल्या. त्यांचे वेळोवेळी स्टडी कॅम्पस् भरत होते. त्यातील वक्ते मुख्यत: तर्कतीर्थ, मणिबेन आणि पारीख असत. ते शेतकऱ्यांचे, तरुण विद्यार्थ्यांचे आणि काही वेळा शिक्षकांचे मेळावे भरवत. मोठ्या संख्येने जत, अलिबाग, कणकवली, कोलाबा, पोयनाड वगैरे ठिकाणी शेतकरी जमत. रॉय यांनी 'दि सेंटर फॉर दि स्टडी ऑफ सोशल चेंज' अशी एक संस्था सुरू केली. सामाजिक परिवर्तनावर त्यात अभ्यास आणि संशोधन होणार असे ठरले. त्याचे फौंडर मेंबर म्हणून तर्कतीर्थ होते. रॅ. डे. पक्षाने 'दि इंडिपेंडट इंडिया' हे साप्ताहिक सुरू केले. तेच पुढे 'दि रॅडिकल ह्यूमॅनिस्ट' अशा नावाने प्रसिद्ध होऊ लागले. बौद्धिके, बैठकी, अधिवेशने यायोगे रॉय यांची विचारसरणी लोकांपर्यंत पोहचवली जात होती. तर्कतीर्थांचे व्याख्यानाचे दौरे आणि लेखन चालू होते. रॉयवादी विचाराचे सार म्हणजे नवमानवतावाद असे होते.

नवमानवतावाद हा तर्कतीर्थांच्या मते संतवाङ्मयात आढळून येणाऱ्या मानवतावादापेक्षा बराच वेगळा. संतांच्या मानवतावादी विचारात मनुष्यापेक्षा श्रेष्ठ अशा ईश्वरास शरण जाण्याला महत्त्व होते. अशा ध्येयवादात मनुष्याचा आत्मविश्वास

वाढविण्याची ताकद नसते. तर्कतीर्थ म्हणून सांगत की, आत्मविश्वास बळकट होईल असा दृष्टिकोन माणसाला दिला पाहिजे. त्यासाठी अनुभव आणि बुद्धिवादाची गरज आहे.

रॉयच्या पक्षातर्फे वाईचे विठ्ठलराव जगताप सातारा विभागात १९४६ च्या निवडणुकीत उभे राहिले होते. स्वातंत्र्य जवळ दिसू लागले होते त्यामुळे काँग्रेसकडे लोकांचा कल असणे हे उघड होते. जगतापांच्या प्रचारासाठी तर्कतीर्थ जेथे जेथे जात होते तेथील प्रचारसभा काँग्रेसचे कार्यकर्ते उधळून टाकत होते. साताऱ्याजवळ अनेवाडीला तर्कतीर्थ बोलण्यास उभे राहिले आणि लोकांनी लगोरीने दगडफेक सुरू केली. ते सभा आवरती घेऊन तिथून निसटले आणि पुढे वाटेत हुमगावला सभा ठरवली होती तेथे पोहोचले. पुन: तसाच प्रकार. फरक एवढाच होता की, तर्कतीर्थांना घेऊन सभेला जमलेल्या लोकांनी लाथाबुक्क्यांचा प्रयोग सुरू केला. काँग्रेसमधील एक नेते तुषार पवार तेथे येऊन पोहोचले. त्यांनी ताबडतोब लोकांना आवाहन करून शांत होण्यास सांगितले. ते तर्कतीर्थांकडे मार्क्सवादावरील अभ्याससत्राला येत असत. तर्कतीर्थांचे सार्वजनिक जीवन त्यांच्या कुटुंबियांनी सहजपणे स्वीकारले होते. परंतु यावेळी मात्र बराच मुक्का मार त्यांना बसल्यामुळे सत्यवतीबाई एवढेच म्हणाल्या की, सभेला आवडते ते बोलावे असे त्यांचे म्हणणे नव्हते पण, जे ऐकू इच्छितात त्यांनाच सांगावे.

रॉय स्वत: मोठे वक्ते नव्हते. ते उत्तम विचारवंत आणि तितकेच चांगले लेखक होते. त्यांनी नवमानवतावादाच्या तत्त्वज्ञानावर अनेक पुस्तके लिहिली. 'इंडिया इन ट्रॅन्झिशन', 'बियाँड कम्युनिझम', 'न्यू ह्युमॅनिस्ट मॅनिफेस्टो' ही त्यांनी लिहिलेली काही पुस्तके. त्यांचे विचार तितक्याच प्रभावीपणे तर्कतीर्थ, गोवर्धन पारीख, शिवनारायण रे, तारकुंडे वगैरे मंडळी वेगळ्याप्रकारे मांडीत. परंपरेतील विचारांना धरून राहिल्यास परिस्थिती स्पष्टपणे कळत नाही. त्यांना बाजूला सारून पुढे जावे लागते. माणसाचे एक माणूस म्हणून समाजात फार महत्त्वाचे स्थान आहे. तर्कतीर्थांच्या मते मानवाच्या पलिकडे कोणतेही उच्च मूल्य नाही. प्रथम मनुष्य, मग समाज आणि राष्ट्र तयार होते. माणसाचे वैशिष्ट्य त्याच्या बुद्धीत आणि नैतिक जाणीवेत दिसते. म्हणून त्यांच्या मते राजकीय आणि सामाजिक संस्था अशा हव्यात की, माणसाला त्या बंधनातून मोकळे करतील आणि वैयक्तिक स्वातंत्र्य अबाधित ठेवतील हेच नवमानवतावादाचे सार आहे.

१९४७ साली भारताला स्वातंत्र्य मिळाले. तोपर्यंत जागतिक राजकारणात

साम्यवाद आणि संसदशाही दोघांनाही अपयश आल्याचे दिसून आले होते. रॉयवादी विचार मंचावर एक वेगळा विचार पुढे येऊ लागला. बहुसंख्य समाज जेव्हा निरक्षर राहतो तेव्हा निवडणुकपूर्व काही आश्वासने मिळाली की, तो भोळसटपणे त्यावर विश्वास टाकतो. अशिक्षित समाजाची मते मिळविणे अवघड नाही. लोकशिक्षण पुरेसे झाले नाही तर निवडणुकीतील यश भ्रामक असते. त्यामुळे कोणाचे हित साधते तर, निवडून येणाऱ्या उमेदवाराचे. पक्षाला मग सत्ता हातात ठेवणे एवढेच करावयाचे असते. असा राजकीय पक्ष म्हणून राहण्यात 'दि रॅडिकल डेमॉक्रॅटिक पक्षा'ला रस नव्हता. पक्षीय राजकारण हे पक्षाच्या नेत्यांच्या हातात सत्ता देण्यासाठी असते. म्हणून पक्षीय राजकारण सोडावे असे ठरले.

१९४८ च्या डिसेंबरमध्ये म्हणजे बरोबर आठ वर्षांनी पक्षविसर्जनासाठी कलकत्याला रॉयवाद्यांचे अधिवेशन भरले. त्याचे अध्यक्ष तर्कतीर्थ होते. पक्षीय राजकारण सोडण्याचा ठराव त्यांनी मांडला. त्यानंतरच्या भाषणात त्यांनी स्वतंत्र भारतात लोकशाही कशी राबविता येईल यासंबंधी कल्पना मांडली. स्वतंत्र देशातील लोकांमध्ये स्वातंत्र्याची भावना जोपासली गेली पाहिजे आणि तसा त्यांना अनुभव यावयास हवा. तशा प्रकारचा समाज निर्माण करण्यासाठी रॉयनी २२ कलमी मार्गदर्शक नियमावली तयार केली होती. त्याच्या आधारे तर्कतीर्थांनी पक्षाच्या अखेरच्या अधिवेशनात आपली भूमिका मांडली. ते म्हणाले भूतकाळाला मागे टाकून पुढे जावे लागेल. कारण तो काळ आता मार्गदर्शक ठरणार नाही. भूतकाळाला भविष्याचे रूप देऊन सामाजिक प्रश्न सोडविता येणार नाहीत. नवमानवतावाद लोकांना भावनिक आवाहन करणार नाही. तो बौद्धिक शिस्त लावून लोकांना विवेकी करणार आहे. आपल्याकडे व्यक्ती म्हणून निकोप जीवन जगण्याची कल्पना तितकीशी रुजली नाही. त्यासाठी पारंपारिक धर्माकडे आशेने बघण्यात अर्थ नाही. पाश्चात्य संस्कृतीत त्याचे उत्तर मिळू शकते. ते म्हणजे वैज्ञानिक मानवतावाद. त्यामुळे सांस्कृतिक वेगळेपणाला बाधा येते असे भय वाटण्याचे कारण नाही.

'रॅडिकल ह्युमॅनिस्ट पक्षातील' सर्वच सदस्य उच्च शिक्षण घेतलेले होते. कोणी वकील, कोणी डॉक्टर, कोणी प्राध्यापक होते. पक्षाच्या प्रचारासाठी ते मनापासून झटले. आता पक्ष उरला नाही तेव्हा ते आपापल्या व्यवसायात नव्याने घडी बसविण्याच्या प्रयत्नास लागले, तरीही त्यांची सामाजिक बांधिलकी तशीच राहिली. सामाजिक प्रश्नांकडे बघण्याची त्यांची पद्धत वैज्ञानिक असून उच्च नैतिक मूल्यांपासून ती वेगळी पडली नव्हती. तर्कतीर्थ मुंबईत असले की, रॉयवादी काहीवेळा

संध्याकाळी गप्पा मारण्यास एकत्र जमत. रॉयवरील त्यांचा विश्वास तसाच राहिला. किंबहुना डेहराडूनला ते रॉय यांच्या निवासस्थानी वर्षातून एकदा नियमित भेटत. रॉय १९५४ मध्ये फेब्रुवारीत गेले, तेव्हा अतिशय जड अंत:करणाने सर्व रॉयिस्टस् एलन रॉय यांच्या भेटीसाठी जमले होते. एलन रॉय या रॉय ह्यांच्या पत्नी, मनाने व विचाराने त्यांच्या पक्क्या साथी होत्या.

रॉयवादी पक्ष लहान होता. त्यामुळे सर्वच सदस्यांमध्ये मैत्रीचे बंध निर्माण झाले होते. तर्कतीर्थांच्या सर्वांत जवळ होते ते म्हणजे गोवर्धन पारीख, मणिबेन कारा आणि व्ही. बी. कर्णिक. या सुहृदांमध्ये विचारांबरोबर थट्टामस्करीचे वातावरण होते. संध्याकाळी हे जमत तेव्हा गप्पांमध्ये फार रंग भरत असे. पारीख १९७६ साली हृदयविकाराच्या झटक्याने गेले. त्यांच्या पत्नी म्हणजे डॉ. इंदुताई पारीख. याही रॉयवादी विचारात मुरलेल्या. तर्कतीर्थ मुंबईत आले की, त्यांचा मुक्काम तोपर्यंत पारीखांकडे असे. पण त्यांच्या मित्राचे अचानक निधन झाले आणि ते विमनस्क झाले. त्यानंतर ते मंडळाच्या बैठकीनिमित्त पारीखांच्या घरी जात राहीले. बैठक संपता-संपता काहीसे आधीच तिथून बाहेर पडत. पारीखांनी तर्कतीर्थांच्या 'हिंदुधर्माच्या समीक्षेचे' इंग्रजीत भाषांतर केले होते. वाईहून त्यांच्या अध्यक्षतेखाली चालणाऱ्या 'नवभारत' मासिकाचे ते संपादक होते. मुख्य म्हणजे एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून गप्पा मारण्याइतकी त्यांची घट्ट मैत्री होती. तर्कतीर्थांच्या साहित्य संस्कृति मंडळाच्या सल्लागार समितीत पारीख होते. याशिवाय प्राज्ञपाठशाळेच्या कार्यकारी मंडळावर पारीख नेहमीच होते. पारीखांचे निधन पचविणे तर्कतीर्थांना फार जड गेले. पुढील पाचदहा वर्षात ए. बी. शहा, व्ही. बी. कर्णिक, मणिबेन कारा, जे. बी. एच. वाडिया हे समवयस्क, समविचारी काळाच्या पडद्याआड गेले. ज्यांच्याबरोबर नियमित गप्पा चालत असत असे तर्कतीर्थांबरोबर फारसे कोणी उरले नाही.

तर्कतीर्थांच्या पत्नीदेखील १९७८ मध्ये अकस्मात गेल्या. त्यांच्या सार्वजनिक जीवनाला त्यांनी सांभाळले होते. विश्वकोशाच्या संपादनाचे काम तर्कतीर्थांकडे होते. त्यासाठी लेखन करणाऱ्या विद्वानांची राहण्याची सोय प्राज्ञपाठशाळेच्या परिसरात केली गेली होती. अनेकजण आपल्या रजेत वा निवृत्तीनंतर तेथे काही काळ राहत. त्यांच्या चहापाण्याची सोय सत्यवतीबाई स्वत: करीत होत्या. त्या विद्वान लेखकांचे पथ्यपाणी आणि रोजचे जेवण नीट केले जाते की नाही ह्यावरही त्यांची देखरेख होती. सत्यवतीबाईच्या जाण्याने ते काहीकाळ सुन्न झाले होते. तर्कतीर्थांची मुले वेगवेगळ्या ठिकाणी आपापल्या व्यवसायात होती. त्यांचा वडील मुलगा मधुकर अमेरिकेत

मोठ्या कंपनीत संशोधक होता आणि एक मुलगी मालती अमेरिकेत आपल्या पतीबरोबर. तर्कतीर्थांना परत व्याख्यानात आणि योग्य नव्या विचारवंतांच्या वर्तुळात गुंतविण्यासाठी त्यांचा निजी सहाय्यक, राम कोल्हटकरच्या प्रयत्नांना काही काळाने यश येऊ लागले. ते फार हळुहळू.

तर्कतीर्थ काँग्रेस पक्षात राहून राजकारणात गुंतले ते दहा वर्षे. १९२८ मध्ये त्यांना गांधींना भेटण्याची पहिली संधी मिळाली होती. ते १९३८ साली काँग्रेसमधून बाहेर पडले. त्यानंतर ते राजकीय जीवनाची वाटचाल रॉयच्या नवमानवतावादावरून आठ वर्षे करीत होते. प्रत्यक्ष राजकीय क्षेत्रातून ते बाहेर पडले तरी त्यातील प्रश्नांकडे ते आस्थेने पाहत. राजकीय पेचप्रसंग आले की एकेक नेते तर्कतीर्थांकडे सल्ला घेण्यासाठी येत. एक वरिष्ठ राजकीय विचारवंत म्हणून यशवंतराव चव्हाण शास्त्रीबोवांकडे अनेक वेळा येत. तर्कतीर्थ रॉयवादींबरोबर वावरु लागले तेव्हा त्यांचा उल्लेख जास्ती करून 'शास्त्रीबोवा' नाहीतर 'शास्त्रीजी' म्हणून होऊ लागला. १९५० साली भारताच्या घटनासमितीने संविधानाला व्यवस्थित रूप दिले. त्या समितीवर शास्त्रीजी होते. त्यांच्या त्या निमित्ताने दिल्लीच्या खेपा होत. त्यामुळे काँग्रेसमधील नव्याजुन्या सदस्यांच्या आणि त्यांच्या वरचेवर भेटी होऊ लागल्या. त्यांच्या विनवणीवरून मग ते पुन: काँग्रेस पक्षाचे १९५० मध्ये सदस्य झाले. परंतु पक्षाच्या कार्यक्रमात सहसा पडले नाहीत. त्याला अपवाद एखाद दुसरा होता.

१९५२ मध्ये मुंबई प्रांतातील निवडणुका होणार होत्या. शास्त्रीजींनी चव्हाणांच्या वतीने काही प्रचारसभा घेतल्या. शेवटची सभा कऱ्हाडला झाली. शास्त्रीबोवांचे भाषण रात्री ११ वाजता संपले. त्यांची रात्री निजण्याची व्यवस्था त्यांच्या एका मित्राकडे म्हणजे पांडुअण्णा शिराळकरांकडे केली गेली होती. पांडुअण्णा तेव्हा हयात नव्हते. त्यांचे पुतणे सोनोपंत तेथे होते. शास्त्रीजी घरी पोहोचण्यापूर्वी कितीतरी मंडळी भेटीसाठी ताटकळली होती. त्यांनी तेव्हा म्हटले की, ''तुम्ही यशवंतरावांसाठी येत असल्याचे थोडे आधी कळते तर तुम्हाला आम्ही पळवून नेले असते आणि तुमची सभा होऊ दिली नसती. तुमच्यामुळे कऱ्हाडकडची दोन हजार मते यशवंतरावांकडे वळणार.'' कऱ्हाडमध्ये शास्त्रीजींनी दोन दशके भाषणे दिली आहेत. सोनोपंतांकडील मंडळींचे म्हणणे होते, हा मतदारसंघ खरे म्हटले तर तर्कतीर्थांचाच आहे. त्या दिवशी उरलेली रात्र गप्पांमध्ये सरली. सकाळी यशवंतरावांना त्या सभेचे वृत्त मिळाल्यावर ते त्यांना भेटावयास गेले. यशवंतराव त्या खेपेला निवडून आले ते त्यांच्या प्रतिस्पर्ध्यापेक्षा फक्त ५२ मते अधिक घेऊन!

मराठी साहित्य क्षेत्रात काही उल्लेखनीय पायंडे पडले आहेत. त्यातील एक, प्रतिवर्षी अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन भरविणे असा होय. त्या संमेलनाच्या अध्यक्षपदी प्रसिद्ध लेखक असण्याची पद्धत होती. त्याला आवर्जून साहित्यिक हजर रहात. तेव्हा अध्यक्षपदी कोणाचे नाव सुचविले जाई. त्यात तेव्हा फारसे प्रतिस्पर्धी नसत. साहित्य संमेलन हा साहित्यिकांचा सोहळा असे. १९५४ च्या ऑक्टोबरमधील मराठी साहित्य संमेलनाचे यजमानपद नव्या दिल्लीकडे होते. त्याचे अध्यक्ष म्हणून शास्त्रीजींची निवड झाली. त्यामुळे ठिकठिकाणी प्रत्यक्ष संमेलनापूर्वी त्यांच्या अभिनंदनासाठी सभा झाल्या. शास्त्रीजी उत्तरादाखल बोलायला उठले की, त्यांचे विचार ललित भाषेतून डोकावत होते. त्या दिल्लीच्या मराठी साहित्य संमेलनाचे उद्‌घाटन पं. नेहरुंनी केले. स्वागताध्यक्ष म्हणून काका गाडगीळ होते. पंतप्रधानांच्या उपस्थितीमुळे सरकारी व बिनसरकारी लोकांची उद्‌घाटनाला फार मोठी गर्दी होती. त्यात साहित्यिकांच्या व्यतिरिक्त उत्तर हिंदुस्थानातील अनेक वृत्तपत्रांचे प्रतिनिधीही होते.

अध्यक्षीय भाषणात तर्कतीर्थांनी साहित्य व संस्कृतीचा संबंध काय याचे विवेचन केले. संस्कृतीतून साहित्य जन्माला येते व ते संस्कृतीला आकार देण्याचेही काम करते असे ते म्हणाले. त्यांनी सांगितले की, मूल्यांचे जतन, संस्कृती परंपरांच्या रूपाने करते. विश्व हा अनिरुद्ध अशा जीवनाचा प्रवाह असतो. त्याचे साहित्य, कला हे आविष्कार आहेत. जीवनाच्या प्रवाहात जे टिकते ते अभिजात मानता येते. अभिजात साहित्यात अर्थपूर्ण जीवनाची समीक्षा असते असे त्यांनी म्हटले. ते गोमांतक मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते तसेच हैद्राबादच्या देखील. कधी पूर्वाध्यक्ष म्हणून तर कधी स्वागताध्यक्ष अशा भूमिकेतून ते साहित्य संमेलनाला हजर असत. अनेक साहित्य संमेलनात मराठी भाषेच्या वापराविषयी ठराव मांडला जात असे. अजूनही जातो. त्यावर तर्कतीर्थांचे म्हणणे वेगळ्या थाटात पुढे येई.

त्यांच्या प्रत्येक सभेत त्यांचे काही लाडके मुद्दे असत. ते अगदी योग्य वेळी योग्य ठिकाणी डोकावत आणि ते कधी अप्रस्तुत वाटत नसत. कोणताही समाज ज्ञानाखेरीज पुढे जाऊ शकत नाही. २० व्या शतकात ज्ञान ज्या वेगाने वाढत गेले त्याच्या संगतीने व्यक्तीने आपला विकास साधावयाचा असतो. त्यांच्या मते प्रत्येकाचे पायाभूत शिक्षण मातृभाषेतून व्हावयास हवे. मातृभाषेच्या प्रश्नाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन मानसशास्त्राचा होता. बालक वाढते तेव्हा काही महिन्यात ते आपले व दुसऱ्यांचे असा फरक करू लागते. माझी आई, माझे बाबा, माझी खेळणी म्हणून ते

काही गोष्टी आपल्याच म्हणून स्वीकारते व बाकी दुसऱ्याचे. आपले व दुसऱ्याचे असा भेद करता येतो ही मानसिक विकासाची खूण आहे. जीवनाला आवश्यक असे कितीतरी ज्ञान नित्याच्या परिचित परिसरातून प्रत्यक्ष शाळेत पाऊल ठेवण्यापूर्वी मुलांना मिळते. ते स्वाभाविकपणे मातृभाषेतून होते. औपचारिक ज्ञान देखील काही काळपर्यंत मातृभाषेतून होणे जरुरीचे असते. आधुनिक ज्ञान देखील मराठीतून देण्यास मराठी भाषा सशक्त असल्याचे त्यांचे म्हणणे होते. रानडे, चिपळूणकरांसारख्यांच्या लिखाणाचा या संबंधात ते उल्लेख करत. त्यांच्यासारख्या साहित्यकारांची प्रतिभा भविष्यकाळाला अभिमुख झाली असे तर्कतीर्थांनी म्हटले होते. मनुष्याच्या भावना, विचार आणि वर्तन व्यक्त करण्यासाठी माणसाला स्वत:ची भाषा लागते. तीच त्याच्यात नैतिक व आध्यात्मिक जाण निर्माण करते.

साहित्य संमेलनातील, मराठी भाषेचा अधिकात अधिक उपयोग होण्याच्या प्रस्तावाला तर्कतीर्थांइतका प्रभावी वक्ता नव्हता. सर्वांप्रत उच्च प्रकारचे ज्ञान मराठी भाषेतून सहज पोहोचले जाते. त्या भाषेतून मराठी माणसास कार्यप्रवृत्त करता येते. त्यामुळे कोणत्याही भावनेचे आवाहन करता येते म्हणजेच वाङ्मयाचे सर्व हेतू साध्य करण्यास मराठी समर्थ असल्याचे ते सांगत. १९८१ मधील मुंबई येथील साहित्य संमेलनात 'मराठी भाषेचे भवितव्य' ह्या विषयावर परिसंवाद झाला. अध्यक्षस्थानी तर्कतीर्थ होते आणि परिसंवादात सुधीर रसाळ, स. शि. भावे, अशोक केळकर, जयंत नारळीकर बोलले. तर्कतीर्थांचे म्हणणे होते 'परिभाषा उपलब्ध होत नाही म्हणून मराठी वापरावयाची नाही आणि ती वापरली जात नाही म्हणून परिभाषा तयार होणे शक्य नाही असा हा खोडा आहे.' त्यांच्या मते, महाराष्ट्र राज्य आले पण मराठी चालली हे स्वत:च्या भाषेवर श्रद्धा नसल्याचे लक्षण आहे.

भारतातील आधुनिकीकरणाची सुरुवात परकीय राज्यकर्त्यांच्या भाषेमुळे झाली. परंतु त्याच भाषेवर आपला संपूर्ण शिक्षणाचा कार्यक्रम बेतणे चूक आहे. हे शिक्षणाच्या मानसशास्त्रात बसत नाही. विज्ञानात पुढे असलेले जपान, जर्मनी, अमेरिका इ. देश आपापल्या भाषांमध्ये शिक्षणाचे व्यवहार चालवतात. पण ज्ञान वाढू लागते तेव्हा संकल्पना आणि सिद्धांत यांची देवाणघेवाण करावी लागते यासाठी आंतरराष्ट्रीय शैक्षणिक कार्यक्रमासाठी इंग्रजीचा उपयोग करणे भाग असते. परंतु प्राथमिक स्तरावर इंग्रजी म्हणजेच परक्या भाषेवर अवलंबून राहिल्यास वरकरणी पाश्चात्य संस्कृतीचे अनुकरण होते खरे, तरी संस्कार पुराणे राहतात.

राष्ट्रीय काँग्रेस आणि रॉयचा नवमानवतावादी पक्ष यांच्याबरोबर काढलेल्या

१८/२० वर्षांच्या काळात तर्कतीर्थांनी काम केले. पक्षाची अधिवेशने, प्रचारसभा, शिबिरे यातून पक्षाचे धोरण, कार्यक्रम आणि त्यामागील तत्त्वज्ञान यावर ते बोलत. त्यांचे भाष्य अतिशय मार्मिक असे. ते विचारवंतांना व सामान्यजनांना सहज कळे. त्यांच्या व्याख्यानांची लोक वाट पाहत. तसेच सामाजिक वा राजकीय प्रश्नांची त्यांची उकल ऐकण्यास लोक उत्सुक असत. त्यांची राजकीय मार्गावर वाटचाल होत असताना साहित्याशी असणारी जवळीक कोठे कमी झाली नाही. ते साहित्य वैचारिक वळणावरचे असे कारण त्याप्रकारच्या साहित्यावर ते वाढले, मोठे झाले. मराठी जगतात तेव्हा लघुकथा आणि कादंबरी असा ललित वाङ्मयप्रकार फारसा निर्माण झाला नव्हता. रानडे, चिपळूणकर, शि. म. परांजपे, टिळक वगैरे विचारवंतांच्या लिखाणाच्या प्रभावाखाली त्यांचे व्यक्तिमत्व घडले. त्यांची लेखनाची भाषा वेगळी होती. बहुतेक भारदस्त अशी. पण एक वक्ते म्हणून ते बोलत तेव्हा सभेतील सर्वांना ते छान समजत असे. ललित वाङ्मय त्यांनी लिहीले नाही तरी साहित्यिकांमध्ये त्यांना निर्विवादपणे स्थान होते.



# साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्षपद

तर्कतीर्थ पक्षीय राजकारणात, त्याच्या प्रचारात आता अडकणार नाहीत असे चित्र काही काळ दिसले. आता यापुढे सर्व रॉईस्टस् वर्षातून एकदा डेहराडूनला जमू लागले. रॉय १९५४ मध्ये गेले खरे, परंतु त्यांची सहचारिणी एलन रॉय या देखील नवमानवतावादी आणि अतिशय कर्तबगार स्त्री होत्या. डेहराडून हे नवमानवतावाद्यांचे जणू तीर्थक्षेत्र होते. तेथे नवमानवतावादी एकत्र आले की, संजीवनी मिळाल्याप्रमाणे उत्साहाने, प्रसन्नतेने परतत असत. राजकीय जीवनातील धावपळ कमी झाली तरी तर्कतीर्थांचा प्रवास फारसा कमी झाला नाही. वयाच्या तेवीस वर्षांपासून राजकारणात रस घेतलेल्या तर्कतीर्थांना त्याची ओढ स्वस्थ बसू देईना.

साधारण भारतीय स्वातंत्र्यापासूनच अगदी वेगवेगळ्या प्रश्नांनी डोके वर काढावयास सुरुवात केली. त्यातील एक होता भाषेनुसार प्रादेशिक राज्यांच्या पुनर्रचनेचा. काँग्रेसच्या १९२१ मधील वार्षिक अधिवेशनात त्या प्रकारचा ठराव मंजूर झाला होता. त्या तत्त्वावर प्रांतरचना होण्याची अनेक काँग्रेस नेते देखील वाट पहात होते. एका उत्साहापायी तो ठराव पास झाला तरी त्यामुळे येणाऱ्या अडचणींचा तेव्हा फारसा विचार झाला नव्हता. अशा विभागणीमुळे एकजिनसी राष्ट्रभावना निकोपपणे वाढली नसती. संकुचित प्रांताभिमानापुढे देशाचा आर्थिक विकास योग्य मार्गावरून पुढे सरकला नसता. त्यामुळे तत्कालीन पंतप्रधान पं. नेहरू तो प्रश्न लांबणीवर टाकत होते. स्थानीय पुढारी मात्र इरेला पेटले होते. आंध्र प्रदेशात भाषिक प्रांतरचनेसाठी श्री. रामलू यांनी प्राणांतिक उपोषण सुरू केले आणि त्यात त्यांचे अखेर निधन झाले. त्यामुळे तेथे हिंसाचाराची लाट उसळली. नेहरूंना त्यानंतर आंध्र प्रदेशाबाबत संसदेत विधेयक मान्य करून घ्यावे लागले.

इकडे महाराष्ट्रात देखील मराठी राज्यासाठी, स्वतंत्र संयुक्त महाराष्ट्र राज्यासाठी जन आंदोलन तीव्र होत गेले. १९५० पासून संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला जोरदार वेग आला. सत्ताधारी काँग्रेस पक्षातच तेव्हा तटस्थ, मवाळ आणि जहाल असे गट

पडले. १९५३ मध्ये फाजल अली आयोग नेमण्यात आला. महाराष्ट्राच्या मागणीवर त्यांनी तोडगा काढायचा होता. त्यातून मग कधी द्विभाषिक राज्याचा, कधी मुंबई हे स्वतंत्र राज्य ठेवण्याचा आणि ती महाराष्ट्रापासून वेगळी करण्याचा प्रस्ताव पुढे आला. वल्लभभाई पटेल, गोविंद वल्लभ पंत, स. का. पाटील, मोरारजी देसाई यांच्याबरोबर यशवंतराव चर्चा करीत राहिले. यशवंतराव कधी शंकरराव देव तर कधी हिरे यांच्याशी संयुक्त महाराष्ट्र राज्यासाठी भेट घेत राहिले. चर्चेचे गुऱ्हाळ चालू होते. त्या वरिष्ठ पुढाऱ्यांच्या गाठीभेटीनंतर यशवंतराव तर्कतीर्थांना भेटण्यासाठी वाईला येऊन जात. तेव्हा एक गोष्ट तीव्रतेने लक्षात येऊन चुकली होती की, दिल्लीतील सत्ताधारी पुढाऱ्यांना महाराष्ट्राच्या मागणीबाबत सहानुभूति नव्हती. मोरारजीभाई महाराष्ट्राचे मुख्यमंत्री असताना चव्हाण स्वत: त्यांच्या मंत्रिमंडळात होते. ते आणि तर्कतीर्थ संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत आपली भूमिका ठामपणे त्या बाजूने घेत नव्हते. आचार्य अत्र्यांनी त्यांच्या 'मराठा' या दैनिकात संयुक्त महाराष्ट्रासाठी जोरदार मोहीम चालू ठेवली होती. त्याला विरोध करणाऱ्यांविरुद्ध अत्र्यांची लेखणी फार धारदार झाली होती. यशवंतराव आणि तर्कतीर्थ महाराष्ट्राच्या विरोधात असल्याचा ते प्रचार करीत होते. तर्कतीर्थांची त्यांनी 'नर्कतीर्थ' म्हणून टिंगल केली होती. संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीसाठी एस. एम. जोशींसारखे नेतेही काम करत होते. मोरारजींच्या निदर्शनावरील बंदीला न जुमानता शेकडो लोक मोर्चा काढीत असत. त्यांच्या राजवटीत मुंबईत १०५ लोक गोळीबारात मरण पावले, ते १९५६ मध्ये. त्यानंतर मोरारजीभाईंना मंत्रीपद खाली करावे लागले. तेव्हा पाठोपाठ यशवंतराव चव्हाण द्विभाषिक राज्याचे मुख्यमंत्री झाले. यशवंतराव तर्कतीर्थांशी सल्लामसलत करून पं. नेहरू, काँग्रेसच्या अध्यक्षा इंदिरा गांधी यांना मराठी भाषिकांची बाजू समजावून देत राहिले. शेवटी संयुक्त महाराष्ट्र राज्याची मागणी मान्य झाली आणि १ मे १९६० साली नवे महाराष्ट्र राज्य निर्माण झाले.

त्या नवीन राज्याचे मुख्यमंत्री म्हणून यशवंतरावांची नियुक्ती झाली. यशवंतरावांना हे राज्य एक आदर्श राज्य म्हणून पुढे यावयास हवे होते. रॉय यांनी जी मार्गदर्शक २२ सूत्रे आधीच तयार केली होती ती यशवंतरावांनी पाहिली होती. त्या दृष्टीने यशवंतराव, तर्कतीर्थ, ह. रा. महाजनी, प्रा. पारीख यांच्याबरोबर नव्या महाराष्ट्र राज्याची आखणी करीत होते. सांस्कृतिक परिवर्तनाचा एक कार्यक्रम यशवंतरावांनी हाती घेतला. त्यांनी 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाची' योजना त्याच वर्षी नक्की केली आणि त्याचे अध्यक्षपद लक्ष्मणशास्त्रींकडे सोपवले. लक्ष्मणशास्त्रींनी आपली सल्लागार समिती तयार

केली. त्यावर नामवंत साहित्यिक आणि विचारवंतांना घेतले. डॉ. ना. गो. कालेलकर, ए. ए. फैज, पु. ल. देशपांडे, डॉ. सरोजिनी बाबर, प्रा. पारीख आणि सेतुमाधवराव पगडी यासारखी मंडळी त्यात होती. तर्कतीर्थांच्या अध्यक्षतेखालील मंडळाने त्यांची उद्दिष्टे ठरवली. त्यात आधुनिक जगात मराठी माणसाला यशस्वी होण्यासाठी त्याचा परिचय जगातील समृद्ध साहित्याशी होणे जरुरीचे होते. शिवाय कामगार अधिक कुशल होण्यासाठी त्याच्यासाठी योग्य असे साहित्य तयार करवणे आणि इतर प्रादेशिक साहित्याकडे मराठी माणसाला वळता यावे म्हणून शिक्षण कार्यक्रमही आखण्याचे नक्की झाले. हे सर्व सांस्कृतिक धोरण अमलात यावे म्हणून मंत्रालयात सहाव्या मजल्यावर एक स्वतंत्र कार्यालय उघडण्यात आले. तर्कतीर्थ महिन्यातून १५ दिवस तरी त्या कचेरीत येऊन जाऊन हजर असत.

या नव्या जबाबदारीसाठी साहित्यिकांशी संपर्क करता यावा म्हणून तर्कतीर्थांच्या घरी प्रथमच फोनची व्यवस्था केली गेली. साहित्य संस्कृति मंडळ हे यशवंतरावांचे विशेष वेगळे म्हणून लाडके मंडळ होते. मंडळावरील सदस्यांच्या बैठकी नियमित,महाराष्ट्रातील महत्त्वाच्या शहरामध्ये, विशेषत: मुंबईत अनेकवेळा होत असत. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाची औपचारिक सुरुवात झाली आणि मंडळाने एका आगळ्यावेगळ्या प्रकल्पाची रूपरेखा तयार केली. ती अद्यावत मराठी ज्ञानकोश तयार करण्याची. ज्ञान वेगाने वाढू लागले होते आणि ते उपलब्ध होण्यासाठी नवी साधने तयार होत होती. हे नव्याने तयार होणारे ज्ञान, त्याचा विस्तार आणि सखोलता व्यवस्थित मांडणे हे काम एकट्यादुकट्याचे नव्हते. नव्या ज्ञानशाखांसाठी त्या त्या विषयातील तज्ज्ञ लेखकांची मदत घ्यावी लागणार होती. सर्वंकष ज्ञानावर तज्ज्ञांकडून लेखन करून घ्यावे लागणार होते. त्यांच्यासाठी संदर्भ ग्रंथालय उभे करावे लागणार होते. लिहून आलेल्या मजकुराची छाननी, टंकलेखन आणि तपासणी करून ते प्रकाशनासाठी सिद्ध करण्यासाठी प्रशासन वर्ग तयार करावा लागणार होता. या प्रकल्पासाठी शासनाने आर्थिक तरतुदही केली. 'एनसायक्लोपिडिया ब्रिटानिका'च्या धर्तीवर तयार होणाऱ्या या ज्ञानकोशाला **'मराठी विश्वकोश'** म्हटले जाणार होते. त्याचे २० खंड तयार होतील असेही सुरुवातीला नक्की झाले. ज्ञानाचा विस्तार ज्या तऱ्हेने आणि वेगाने त्या काळात सुरू झाला त्या दृष्टीने मुद्रणालयात खंड जाण्यापूर्वी नोंदीमध्ये भर पडण्याची शक्यता लक्षात देखील घेतली होती.

मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक तर्कतीर्थ होते आणि मग विभाग संपादक,

सहाय्यक संपादक निवडले गेले. सल्लागार समितीत चांगले साहित्यिक आणि मे. पु. रेगे, अनंत काणेकर, अ. भि. शाह यांच्यासारखे प्राध्यापक, डॉ. कोलते, बापूराव नाईक अशी मंडळी होती. जगभर निर्माण होत असलेल्या सर्व विषयांचे ज्ञान मराठी वाचकांसमोर येणार होते. मराठी विश्वकोशासारखा प्रकल्प त्यापूर्वी इतर कोणत्याही राज्यात नव्हता. ह्या कोशाचे संपादकीय कार्यालय वाई येथे केवलानंद सरस्वतींच्या समाधीच्या इमारतीत सुरू करण्याचे ठरले. कितीही चांगला उपक्रम असला तरी त्यावर वाद सुरू करणे हे इकडील माणसाच्या स्वभावाचे वैशिष्ट्य असावे. वाईसारख्या आडगावात असे कार्यालय केवळ तर्कतीर्थांची सोय व्हावी म्हणून केले गेले अशी ओरड वर्तमानपत्रात सुरू झाली. त्या गावी इच्छा असली तरी सुद्धा विद्वान, लेखनासाठी जाण्यास कसे तयार होणार याबद्दल शंका व्यक्त केली गेली.

सर्व विरोधी मते आणि विचार वर्तमानपत्रात काही दिवस प्रसिद्ध झाल्यावर शासनातर्फे तर्कतीर्थांनी त्यावर खुलासा केला. विश्वकोशासाठी अभ्यागतांना सरकारकडून रोज रु. ३५ मान्य केले गेले होते. त्या तरतुदीत त्यांचे राहणे, जेवणखाण, चहापाणी, वाईखेरीज इतर कोणत्याही गावात होऊ शकले नसते. पदरमोड करून तज्ज्ञांना बोलावणे फार चुकीचे ठरले असते. शिवाय वाईत शांत वातावरण, स्वच्छ हवा, पाणी आणि कार्यालयातून जाण्यायेण्यात वेळ जाणार नव्हता. आणखी काही दिवस वाद चालू राहिला परंतु जोडीला विश्वकोशाचे कामही सुरू झाले. ते नोव्हेंबर १९६२ मध्ये.

दरम्यान आणखी एक घटना घडली आणि यशवंतरावांना महाराष्ट्रातून केंद्रीय मंत्रिमंडळात जाण्याची संधी आली. चीनने भारतावर आक्रमण केले, तेव्हा लोकांचा तेव्हांच्या संरक्षण मंत्र्यांवरील-कृष्ण मेनन यांच्यावरील विश्वास उडाला. नव्या महाराष्ट्र राज्यातील यशवंतरावांचे धोरण व योजना यावर लक्ष असलेल्या पं. नेहरुंनी त्या जागेवर यशवंतरावांनी यावे असे ठरवले. नेहरुंनी यशवंतरावांना फोन करून तशी विनंती केली तेव्हा यशवंतराव म्हणाले, ''विचार करण्यास थोडी सवड द्यावी.'' नेहरुंनी त्यांना उलट विचारले, ''कोणाचा सल्ला घेणार?'' यशवंतरावांनी सांगितले, ''माझ्या पत्नीचा.'' त्यांनी वेणुताईबरोबर चर्चा केलीच पण पाठोपाठ वाईला तर्कतीर्थांकडे फोन लावला. दुसऱ्या दिवशी तर्कतीर्थ मुंबईत चव्हाणांसाठी आले. त्या दोघांचे बराच वेळ बोलणे झाले. तर्कतीर्थांनी त्यांना केंद्रात जाण्याची संधी सोडू नये आणि राष्ट्र वाचले तर महाराष्ट्र तरेलच असा सल्ला दिला. महाराष्ट्रावर आणि आता त्यांच्या त्यातील अनेक योजनांवर यशवंतरावांचा फार जीव जडला होता. ते दिल्लीकडे गेले तरी बराच काळ महाराष्ट्र

राज्यावर त्यांचे लक्ष लागलेले होते.

विश्वकोशाच्या लिखाणासाठी काहींनी आपल्या प्राध्यापकीय व्यवसायाचा राजीनामा दिला होता. ते काही वाईतच आपल्या कुटुंबासहित राहू लागले. काहीजण आठवडाभर काम करून पुन: पुंण्यामुंबईला आपल्या घरी व परत वाईकडे जात येत. सुट्टीत विश्वकोशाच्या लिखाणासाठी आलेल्या लोकांची बरीच गर्दी होई. कार्यालयाच्या वेळेव्यतिरिक्त त्या विद्वानांना पुष्कळ उसंत राही, काहीजण गप्पातच अधिक रंगले. त्यांचे कोशाच्या लिखाणाकडे पूर्ण दुर्लक्ष होत राहिले. विद्वान लोकांना कामासाठी उद्युक्त करणे, विशिष्ट शिस्तीत बसवण्याचा प्रयत्न करणे ही गोष्ट कधीच सोपी नसते. त्यातून सुरुवातीलाच एका प्रश्नाने डोके वर काढले. असमाधानकारक कामगिरी-बद्दल तर्कतीर्थांनी दि. के. बेडेकरांना कामावरून कमी करण्याचा निर्णय घेतला. दि. के. बेडेकर हे चांगले समीक्षक. त्यांना विद्वानांमध्ये प्रतिष्ठा होती. त्यामुळे असा निर्णय घेणे सोपे नव्हते तरी तर्कतीर्थांनी तो घेतला. अर्थात बेडेकर दुखावले गेले. त्यांनी तर्कतीर्थांविरुद्ध मुंबईच्या हायकोर्टात खटला भरला. कामचुकार बुद्धिवंतांविरुद्ध असा लढा करणे हे तर्कतीर्थांना बिलकुल आवडत नव्हते. पण अशा वृत्तीचा कार्यालयाच्या कामावर अनिष्ट परिणाम होतो म्हणून अशा अप्रिय गोष्टींना त्यांना सामोरे जावे लागले.

तर्कतीर्थ साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्ष म्हणून १९८० पर्यंत काम पहात होते. विज्ञान, वैद्यक, इतिहास, धर्म, सामाजिक शास्त्रे आणि ललित कला या विषयांवर मंडळाने १०० नवी पुस्तके प्रसिद्ध केली. शिवाय जगात मान्यवर असलेल्या जे. एस. मिल, रुसो, रसेल, जदुनाथ सरकार, पां. वा. काणे यांसारख्या विचारवंतांची पुस्तके पुनर्प्रकाशित केली. अनेक भाषांतरित पुस्तकेही प्रसिद्ध झाली. काही दर्जेदार मासिकांना आर्थिक सहाय्य दिले. महाराष्ट्र राज्य शासनाला राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, अभिवृद्धी होणे जरुरीचे वाटले होते. त्या मार्गावर साहित्य संस्कृति मंडळाची वाटचाल चालू होती. एक नवा वाङ्मयीन इतिहास तर्कतीर्थांच्या मार्गदर्शनाखाली घडत होता.

विश्वकोशाचा परिचयखंड १९६५ साली प्रसिद्ध झाला. पाठोपाठ एक परिभाषा कोशही. त्यात नव्याने निर्माण झालेल्या शास्त्रीय संकल्पना व सिद्धांत यासाठी मराठी पर्यायी संज्ञा बनविल्या होत्या. विश्वकोशनिर्मितीचा पहिली १२ वर्षे हा काळ, सुवर्णकाळ म्हणता येईल. ह्या अभिनव प्रकल्पात सामील झालेल्या सर्वांना फार उत्साह होता. लोकांना त्या बाबतीत उत्सुकता होती. स्वत: चव्हाण महाराष्ट्राबाहेर होते तरी तर्कतीर्थ आणि राज्यकर्ते यांच्याशी त्यांचा पुन: पुन: संपर्क असे. तेव्हाचे सरकार आवश्यक तरतुदी करीत होते. मराठी विश्वकोशाचे पहिले ५ खंड

प्रकाशनासाठी तयार होते. परंतु आता केंद्रात पंतप्रधान म्हणून मोरारजी देसाई होते. प्रकाशन समारंभासाठी चव्हाणांनी, तर्कतीर्थांना, प्रमुख पाहुणे म्हणून मोरारजींना बोलवावे असे सुचविले. मोरारजी देसाईनी पुढील वर्षी म्हणजे १९७७ च्या जुलैमध्ये त्यासाठी येण्याचे कबुल केले. पुण्यात प्रतिष्ठितांच्या भरगच्च समारंभात पंतप्रधानांच्या हस्ते, प्रकाशन समारंभ झाला. मोरारजीभाईंचे भाषण फार रोचक झाले. अशा कोशाचे आणि प्रमुख संपादक म्हणून तर्कतीर्थांचे त्यांनी कौतुक केले. त्यांनी म्हटले होते की, देश स्वतंत्र झाला तरी मातृभाषेतून लोक व्यवहार करण्यास अजूनही फार वेळ लागत आहे. त्यांच्या मते भारतीय संस्कृति भारतीय भाषांमध्ये सामावली आहे, इंग्रजीत नव्हे. मराठी विश्वकोशाचे महत्त्व त्या दृष्टीने किती आहे याविषयी ते बोलले. हे काम पूर्ण करण्यास महाराष्ट्र सरकारने तर्कतीर्थांना जरूर ती सर्व मदत केली पाहिजे असे त्यांनी आपल्या भाषणात सूचित केले.

१९७७ साली वसंतदादा पाटील महाराष्ट्राचे मुख्यमंत्री झाले. विश्वकोश निर्मिती मंडळाच्या कार्यालयातील काही जागा अनेक कारणांमुळे रिकाम्या होत गेल्या. नव्या मंडळींना नेमावे लागणार होते. पण आजपर्यंत साहित्य संस्कृति मंडळ स्वायत्त होते. आता चित्र बदलले. यापुढे सरकारी लाल फितीत त्याबद्दलचे निर्णय अडकून पडू लागले. त्यामुळे चांगल्या मुरलेल्या मातब्बर मंडळीत उत्साह उरला नाही. तर्कतीर्थ मुख्यमंत्र्यांशी पत्रव्यवहार करीत होते. अधुनमधून टेलिफोन करून अडचणी सांगत होते. चव्हाणांनी विचारणा केल्यावर त्यांनाही ते अडथळे कसे येत आहेत हे सांगत राहिले. विश्वकोशाचे आणखी दोन खंड ७ वा व ८ वा पाठोपाठ दोन वर्षात पुरे झाले. प्रशासकीय अडचणी वाढत गेल्या आणि विश्वकोश संपादनाची गती मंदावत गेली. मुख्यमंत्र्यांकडून आश्वासन मिळाले तरी त्यावर कारवाई होईना.

तर्कतीर्थांनी धर्म, तत्त्वज्ञान, संस्कृती, राजकीय तत्त्वज्ञान, भारतीय नीतिशास्त्र, जैन, बौद्ध व हिंदुधर्म अशा विषयांवर विश्वकोशातून १०० च्या वर नोंदी लिहिल्या. साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्ष आणि मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक या दुहेरी भूमिकेमुळे त्यांना वेगवेगळ्या निमित्ताने अध्यक्ष वा प्रमुख वक्ते म्हणून बोलावणी येत असत. राजकारणी मंडळी, साहित्यिक, सामाजिक चळवळीतील नेते, वैज्ञानिक आणि मंत्री या सर्वांशी त्यांचे वारंवार संबंध येत. अनेकांबरोबर त्यांच्या गप्पांच्या मैफली रंगत. १९७० नंतर मुंबईतील प्रवासात सरकारी गाडी त्यांना वापरता येऊ लागली. नंतर दोन वर्षांनी त्यांना पूर्णवेळ सरकारी गाडी व ती चालवण्यासाठी एक चालक अशी व्यवस्था झाली. मंडळाची बैठक वा विश्वकोश निर्मिती मंडळाची बैठक

असेल तेव्हा ते आपल्या गाडीतून प्रवास करू लागले. त्यांच्या प्रवासात त्यांचा निजी सहाय्यक असेच पण बहुधा मे. पु. रेगे, कधी सुभाष भेंडे, डॉ. इनामदार, माधवराव गडकरी तर कधी त्यांचे प्रथमपासून वैचारिक बंध असलेले वसंतराव कर्णिक किंवा द्वा. भ. कर्णिक गाडीच्या प्रवासात असत. त्यामुळे प्रवासात विविध विषयांवर त्यांच्या गप्पा रंगत. तर्कतीर्थ काही वेळा त्यांच्या निजी सहाय्यकाला-राम कोल्हटकरला गमतीत म्हणत की, ''तू महत्त्वाकांक्षी असतास तर या गप्पांवर टाचणे करून चांगले साहित्य प्रकाशात आणून प्रसिद्धी मिळवू शकला असतास.''

एवढ्या बैठकी आणि इतक्या सार्वजनिक सभांमधून भाषणे करीत तर्कतीर्थ ठिकठिकाणी जात. गाडीच्या चारपाच तासाच्या प्रवासातही ते कधी थकले आहेत असे चित्र नव्हते. त्यांच्या भाषणांची आणि विचाराची दखल सर्व वृत्तपत्रे घेत आणि त्यांच्या विचाराचा वेध घेतला गेला नाही असा आठवडा सहसा गेला नाही. आपल्या सभेच्या ठिकाणी वेळेवर पोहोचण्याची त्यांची शिस्त असे. सभेच्या जागी फार आधी पोहोचल्यास आयोजकांची तारांबळ उडते व वेळेपेक्षा उशीर होत गेल्यास लोकांचा विश्वास उरत नाही असे त्यांचे म्हणणे होते. विषय आणि प्रसंगाला योग्य असे ते बोलत. कठीण विषयाचे पदर ते इतक्या सहजपणे उकलत की, श्रोते मनापासून दाद देत.

राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे काम ठीक चालले होते परंतु विश्वकोशाचे काम ज्या वेगाने पूर्ण व्हावयाचे होते ते शासनाला प्रशासकीय अडचणी दूर करता येईनात म्हणून थंडावू लागले. या परिस्थितीत एका नव्या वादाला जाहीरपणे तोंड फुटले. तर्कतीर्थांकडे साहित्य संस्कृति मंडळ आणि विश्वकोश निर्मिती मंडळ या दोहोंचे अध्यक्षपद दिल्यामुळे मंडळाच्या कामाकडे दुर्लक्ष होत आहे. तर्कतीर्थांनी साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्षपद सोडून फक्त मराठी विश्वकोशाचे संपादन करावे अशी मते व्यक्त होऊ लागली. महाराष्ट्र टाइम्सच्या २४ जुलै १९८० च्या अग्रलेखाचा विषय त्या दोन्ही मंडळाची फारकत हा होता. तर्कतीर्थ सर्वमान्य विद्वान असले तरी त्यांच्या इतर कार्यक्रमामुळे विश्वकोशात लिखाण करणाऱ्या इतर मंडळींशी त्यांना संबंध ठेवणे जमत नाही. तर्कतीर्थांनी नेमलेल्या तज्ज्ञांच्या कार्यक्षमतेवरही शंका व्यक्त केली गेली.

अशा जाहीर वादाबरोबर पडद्याआड बऱ्याच घडामोडी वेग घेत होत्या. बॅरिस्टर अंतुले तेव्हा महाराष्ट्राचे मुख्यमंत्री होते. त्यांना तर्कतीर्थांनी भेटून काय काय अडचणी येतात याची माहिती दिली. त्यांना मुख्यमंत्र्यांनी सहानुभूति दाखवली. आणि १९८१

च्या एप्रिलमध्ये त्यांनी दोन मंडळे वेगळी करून टाकली. यानंतर तर्कतीर्थ फक्त विश्वकोशाचे काम बघणार होते. मंत्रालयातील कार्यालयाकडे आता त्यांना जावे लागणार नव्हते. मराठी विश्वकोशासाठी एक स्वतंत्र छोटे कार्यालय व्ही. टी. स्टेशनसमोरील मराठी वृत्तपत्रसंघाच्या बाजूच्या बैठ्या बरॅक्समध्ये तयार झाले. बापुराव नाईक हे छपाई तंत्रज्ञानाचे जाणकार. ते साहित्य संस्कृति मंडळावर होते तसेच विश्वकोशाच्या सल्लागार समितीत देखील. त्यांनी यशवंतरावांना एक सविस्तर पत्र लिहीले. त्यात म्हटले की, 'सरकारमान्य संस्थांना एक शाप आहे. या व्यवस्थेत काही असे लोक शिरतात की, ते चालू शासनाशी संबंध जोडून संस्थांवर स्वार होतात. आज मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे तसे होऊ पहात आहे....त्यावर वेळीच उपाययोजना न झाल्यास आपण आरंभिलेल्या आणि तर्कतीर्थांनी कार्यान्वित केलेले हे काम मातीमोलाचे होईल.... तर्कतीर्थ या मंडळाचे प्राणवायू आहेत. या मंडळात काही किंचित् विद्वान शिरल्यामुळे मंडळाचे नुकसान होत आहे.... शास्त्रीजी न बोलता त्या मंडळातून केव्हाही बाहेर पडतील.'

यशवंतरावांना तर्कतीर्थांना एका मंडळाच्या अध्यक्षपदापासून दूर करण्याच्या हालचालींची कल्पना होती. त्यांचा तर्कतीर्थांबरोबर पत्रसंबंध नित्य होता. यशवंतरावांना दिल्लीत पंतप्रधान इंदिराजींबरोबर अनेकवेळा अडचणी येत होत्या. आणीबाणीनंतर ते इंदिरा काँग्रेसपासून काही काळ दूर राहिले होते. पुन: त्या पक्षात जाण्यासाठी ते ताटकळत राहिले. तेव्हा महाराष्ट्रात फार तीव्र प्रतिक्रिया उमटू लागल्या. त्यावेळी तर्कतीर्थांनी यशवंतरावांना लिहिले की, 'तुमच्याबद्दल अनुकूल असलेली मंडळी आता विषण्ण होऊ लागली आहेत. अनेक महत्त्वाच्या व्यक्ती माझ्यावरही जोरदार टीका करतात. त्यांना वाटते मी तुम्हाला चुकीचा सल्ला दिल्यामुळे महाराष्ट्रातील एक धोरणी, समंजस आणि विवेकी नेतृत्व यशवंतरावांच्या रुपाने लाभले होते, त्याला मुकावे लागले आहे.'

आणीबाणीनंतर यशवंतराव फार निराश झाले होते. तेव्हा तर्कतीर्थांनी त्यांना लिहिले की, 'त्यांचे सर्व जीवन राजकीय व सार्वजनिक क्षेत्रात गेले आहे. त्यात इतके मोलाचे अनुभव आले असतील. तेव्हा आता रोज न चुकता ते ते अनुभव व त्या जीवनातील लोक, घटना आणि त्यावरील प्रतिक्रिया लिहून काढाव्यात. कदाचित यशवंतरावांनी ते काम आधीच सुरू केले असेलही. त्यात भारतीय इतिहासाचा फार महत्त्वाचा काळ येऊन जाईल. या लिखाणातून उत्कृष्ट साहित्य निर्माण होऊ शकते. त्याला 'जर्नल' असे म्हणतात.'

वेणुताई या यशवंतरावांच्या सहधर्मचारिणी. त्यांचे अतिशय समंजस असे व्यक्तिमत्व. त्या १९८४ च्या जूनमध्ये निधन पावल्या. यशवंतरावांना पत्नी– वियोगाचे दु:ख सहन करणे फार जड गेले. त्यांनी तर्कतीर्थांना वेणुताईखेरीज कसे जगावे असे वारंवार म्हटले. यशवंतरावांची पुण्यात 'रिव्हिएरावर' तर्कतीर्थांनी गाठ घेतली व त्यांचे सांत्वन करण्याचा थोडाफार प्रयत्न केला.



# राज्य साहित्य संस्कृति मंडळातून बाहेर

तर्कतीर्थांना साहित्य संस्कृति मंडळाच्या अध्यक्षपदापासून दूर करण्याची खेळी करण्यात त्यांचे काही मित्रही सामील होते. शासनाने एका चार ओळीच्या पत्राने ती दोन मंडळे वेगळी करत असल्याचे तर्कतीर्थांना कळविले. त्यानुसार यापुढे त्यांनी विश्वकोशाच्या संपादनाची जबाबदारी तेवढी सांभाळायची होती. वीस वर्षे त्या मंडळाच्या प्रमुख स्थानी असताना पुढील अध्यक्ष कोणाला करावे असे मत तर्कतीर्थांना विचारणे योग्य ठरले असते. परंतु तसे घडले नाही. प्रशासकीय अडचणी चालू राहिल्या आणि पुढील खंडांचे संपादन सुरू राहिले. इतकेच नव्हे तर तर्कतीर्थांनी एका नव्या प्रकल्पाची योजना तयार केली. डॉ. ताकवल्यांनी मुलांसाठी कुमारकोश तयार करण्याचा ठराव मांडला होता. तो संमत होऊन त्याची समिती नेमण्यात आली. **कुमारकोश** हा तेरा वर्षांपुढील वयोगटासाठी होता. त्याला पूरक ठरेल असा त्यापूर्वीच्या वयोगटासाठी एक **किशोरकोश** तयार व्हावा अशी देखील तयारी सुरू झाली.

**कुमारकोश** आणि **किशोरकोश** या कोशांचे स्वरूप, टाईप, खंड, चित्रे, नोंदी, भाषेचे रुप, परिचय खंडाची आखणी या सर्व गोष्टींवर तपशीलवार योजना तयार झाली. मुलांना आकर्षित करतील असे विषय, जोडीला चित्रे, रंजक भाषा, विज्ञानकथा, साहसकथा, क्रीडा यांना त्यात योग्य असे महत्त्व दिले जाणार होते. बालमानस लक्षात घेऊन हे दोन कोश तयार होणार होते. त्यासाठी जाणकार लोकांवर एकेका विषयावरील नोंदी लिहिण्याचे काम सोपवले गेले. मुलांसाठी लिहिणाऱ्या लेखकांचा होकार येऊनही ठरलेल्या मुदतीत त्यांचे लिखाण आले नाही. १९८५-८६ पर्यंत पुन: पुन: बैठकी बोलावल्या गेल्या. पण या कोशाचे काम पुढे सरकेना. अखेर विश्वकोशासाठी जीवविज्ञानात लिखाण करणाऱ्या डॉ. ना. भा. इनामदारांकडे ती जबाबदारी सोपवली. त्यांनी काही लेखकांना वैयक्तिकरित्या गाठून परिचय खंडासाठी नोंदी लिहिण्यास विनविले. त्याप्रमाणे नोंदी तयार झाल्या. पण ते काम

मुद्रणालयाकडे जाईना. ना. भ. इनामदारांचे वय ८०च्या पुढे सरकले होते. तर्कतीर्थांनी सोपवलेले काम पूर्ण करण्यासाठी त्यांनी कसोशीने प्रयत्न केला. त्या दोघांना त्या कोशाचे काम मार्गी लागल्याचे पहावयाचे होते. विश्वकोश निर्मितीच्या बैठकीत प्रत्येक वेळी नव्या अडचणींचा पाढा मंडळाचे सचिव पंढरीनाथ पाटील वा वडे यांच्याकडून वाचला जाई. आता प्रथमच तर्कतीर्थांचा आवाज चढू लागला. आजपर्यंत आपल्या समवेत वा हाताखाली काम करणाऱ्यांबरोबर ते नेहमीच सौजन्याने वागले होते. पण आता होत असलेला विलंब त्यांना निराश करू लागला. त्यांचा अमेरिकेत स्थायिक झालेला मुलगा त्यांनी अमेरिकेत अधिक काळ त्यांच्यापाशी रहावे म्हणून आग्रह करी. परंतु विश्वकोशाचे नियोजित खंड प्रकाशीत झाले की, आपण सवड काढू असे ते म्हणत.

१९८१ ते १९९० हा काळ तर्कतीर्थांच्या जीवनातील संमिश्र यशाचा होता. वैयक्तिक पातळीवर त्यांचे अगदी निकट असे काही स्नेहसंबंध काळाच्या ओघात संपून गेले. त्यांचे एक मित्र, अगदी कठोर असे विवेकवादाचे पुरस्कर्ते होते. ते म्हणजे प्रा. अ. भि. शहा. शहा हे गणिताचे प्राध्यापक आणि विज्ञानपद्धतीचे भोक्ते. तर्कतीर्थांपेक्षा शहा बरेच लहान पण त्यांची वैचारिक देवाणघेवाण एकाच पातळीवर होती. त्या दोघात काही कारणाने तणाव आला. प्रा. शहा फार खंतावले आणि वयाच्या ६३व्या वर्षी हृदयविकाराच्या झटक्याने गेले. यशवंतराव हे, तर्कतीर्थांनी राजकारणात पाऊल ठेवले तेव्हांपासून पुढील पन्नास वर्षे तरी निरपेक्ष स्नेहाने बांधले गेले होते. ते त्यांच्या पत्नीच्या निधनानंतर पाच महिन्यातच गेले. चव्हाण गेल्याचे वसंतदादा पाटलांनी लगेच तर्कतीर्थांना फोनवर कळविले. तेव्हा त्यांचा अंत्यविधी कोठे होणार आहे असे विचारल्यावर वसंतदादांनी 'काही नक्की ठरले नाही' असे म्हटले. चव्हाणांच्या मृत्यूने तर्कतीर्थांना रात्रभर झोप आली नाही. मग सकाळच्या बातम्यांचा वेध घेऊन ते सकाळी कऱ्हाडकडे निघाले. तेथे पोहोचल्यावर थोड्याच वेळात हेलिकॉप्टरने यशवंतरावांचा पार्थिव देह आणला गेला. कऱ्हाडच्या आसपासच्या गावांमधून अफाट जनसमुदाय तेथे लोटला होता. त्यांच्या पार्थिवाला सामोरे प्रथम तर्कतीर्थ गेले. ते आणि यशवंतराव मोहिते नंतर एकत्र बसले होते. तेथे काहींची भाषणे झाली. त्यात तर्कतीर्थही यशवंतरावांवर बोलले.

तर्कतीर्थ आता चौऱ्याऐंशी वयाचे होते. वैचारिकतेने जोडले गेलेले अनेक स्नेही आता राहिले नव्हते. राजकारण आणि राज्यकर्ते यांच्या काम करण्याच्या पद्धतीत फार मोठा फरक पडला होता. सार्वजनिक जीवनात नीतिमूल्यांची बरीच पडझड झाली

होती. त्या वयातही तर्कतीर्थांची तब्येत त्यांनी चांगली राखली होती. सकाळी नियमाने तासभर फिरण्याचा व्यायाम ते घेत असत. त्याला ते चरणयोग म्हणत असत! जोडीला लवकर उठून योगासने व प्राणायाम यात त्यांचा कधी खंड पडला नाही.

राम कोल्हटकर आता काही नव्या लेखक मित्रांच्या, वृत्तपत्रकार, प्रकाशक आणि साहित्यिक मंडळींच्या वर्तुळात, तर्कतीर्थ रमतील का हे पहात होता. त्यात डॉ. इनामदार होते तसेच वृत्तपत्रसंपादक माधव गडकरी, सुभाष भेंडे, अरुण टिकेकर, पुण्यात प्रा. धडफळे आणि प्रकाशक मधुकाका कुळकर्णी. सोलापूरला राम पुजारी, नागपूरला राम शेवाळकर एक नाही अनेकजण प्रत्येक शहरात शास्त्रीजींवर लोभ असणारे आणि चहाते होते. सकाळची बैठक, संध्याकाळी कोठे जाहीर सभेत भाषण. या कार्यक्रमानंतर उशीरापर्यंत कोणा साहित्यिकांच्या घरी गप्पांची बैठक भरे. त्यात काव्यशास्त्र विनोदाला उधाण येई आणि अनेक प्रथितयश लोकांच्या जीवनातील काही घटनांना उजाळा मिळे. पुण्यातील मधुकाका कुळकर्णी हे मोठे प्रकाशक होते. त्यांनी पु. ल. देशपांडे, य. दि. फडके, माधवराव गडकरी, अरुण टिकेकर, तर्कतीर्थ आणि अनेक मान्यवरांचे साहित्य प्रकाशित केले होते. त्यांच्याकडे अनेक लेखकांचा राबता असे. अनेक वेळा पुस्तकाच्या प्रकाशनाच्या समारंभात प्रमुख पाहुणे म्हणून ते तर्कतीर्थांना बोलावू लागले होते. लेखक अनेक, त्यांचे विषय वेगळे तरीही त्या विषयात तर्कतीर्थांची खास टीकाटिपणी असे.

१९८४ मध्ये पं. कुमार गंधर्वांचा ६० वा वाढदिवस मोठ्या कल्पकतेने देवासला आयोजित केला गेला होता. त्यांच्या गायनशैलीचे अमाप कौतुक असणारे राम पुजारी आणि डॉ. कवठेकर यांनी समारंभाची सर्व व्यवस्था पाहिली. कुमारांच्या कलेवर आसक्त असणारी बाहेरगावाहून शंभराहून अधिक मंडळी आली होती. तर्कतीर्थांना कुमारांनी स्वत: येण्याविषयी पत्र लिहिल्यामुळे ते तेथे गेले. त्यांची व्यवस्था 'भानुकुलात' म्हणजे कुमारांच्या घरी होती. तर्कतीर्थ आजपर्यंत गाण्याच्या बैठकींना फारसे कधी गेले नव्हते. तरीही या कलाकाराबद्दल ते ऐकून होते आणि त्यांना कुमारांबद्दल फार आदरही होता. पं. कुमारांच्या सत्कार समारंभात संगीताच्या परिघातील दर्दी आणि रसिकांच्या मेळाव्यात तर्कतीर्थ थोडेसे अवघडले, पण सुरवातीलाच.

कुमारांच्या अभिनंदनासाठी, त्या सायंकाळी सभेला लोकांची फार मोठी गर्दी जमली होती. कुमारांची गायकी, शैली, लोकसंगीताला नवासाज देण्यात त्यांनी दाखवलेली सृजनता यावर पु. ल. देशपांड्यांप्रमाणे अनेक जाणकार बोलले. शेवटी

तर्कतीर्थांना 'चार शब्द' बोलण्याची विनंती केली गेली. तर्कतीर्थ त्या प्रसंगी म्हणाले की, माणसाला या नश्वर जगात अमरत्वाचा ध्यास असतो. त्याला आपल्यावर असलेल्या बंधनांची जाणीव तीव्र असते. त्यातून सुटण्याची, मुक्तीची त्याला आस असते. ते पुढे असेही म्हणाले की, कुमार गंधर्वांनी संगिताच्या साधनेने दिव्यत्वाचा अनुभव घेतला आणि त्यांचे गाणे ऐकताना रसिकांना त्यांनी तसाच अनुभव दिला. त्यांनी कुमार गंधर्व शागीर्द आणि उस्ताद असे दोन्हीही असल्याचे म्हटले. पश्चिमी संस्कृतीपुढे भारतीय संगिताने एक आव्हान आणि आश्चर्य उभे केल्याचे त्यांनी सांगितले. तर्कतीर्थांच्या भाषणात फार वेगळे मुद्दे डोकावले होते. त्यांच्या भाषणाला चकित करणारा प्रतिसाद मिळाला. त्या सभेनंतर रात्रीच्या जेवणाचा मोठा बेत होता. तर्कतीर्थांच्या बाजूला पु. ल. बसले होते. ते त्यांना म्हणाले 'तुमचे भाषण म्हणजे बडा ख्याल होता. लोक ते ऐकण्यात पूर्णपणे दंग झाले होते.'

तर्कतीर्थ हे गौतम बुद्ध आणि पुढे आद्य शंकराचार्य यांच्या पठडीतील बुद्धिवंत. ते फारसे एका जागी बसले नाहीत. लोकांमध्ये मिळणे, मिसळणे त्यांना फार प्रिय होते. त्यामुळे सभांची आणि भाषणांची आमंत्रणे ते प्रसादाप्रमाणे घेत. रोजच्या डाकेत, अनेक गावातून, अनेक प्रसंगांच्या निमित्ताने आलेल्या निमंत्रणात ते चोखंदळपणा जरुर दाखवीत. परंतु काही वेळा आयोजक त्यांनी यायलाच हवे, त्यांनी प्रमुख वक्ते म्हणून असायला हवे यासाठी आपला कार्यक्रम मागेपुढे करीत. लोकांपर्यंत ते जात राहिले. त्या सभांचा आणि लोकांचा त्यांनी कधी कंटाळा केला नाही. आज फार लोक आले, माझे विचार आणि लेखनाचे वेळापत्रक बिघडले असे त्यांना वाटले नाही. वाईत ते असत तेव्हां विशेषत; उन्हाळ्याच्या वा हिवाळ्याच्या सुट्टीत महाबळेश्वरला विश्रांतीला राहिलेली मंडळी परत जाताना शास्त्रीजींची भेट घेऊन पुढे निघत. राजमोहन गांधी, टाइम्सचे संपादक दिलीप पाडगावकर तर प्रा. दयाकृष्ण, मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु असलेले एस्. एम्. गोरे ही मंडळी तसा निरोप पाठवीत. अनेकवेळा त्यांचे कुटुंबीय बरोबर असत. चहापाणी आणि थोड्या गप्पा करून ते तर्कतीर्थांचा निरोप घेत असत.

काही वेळा एकाच दिवशी दोन कार्यक्रम आणि तेही वेगवेगळ्या गावी असत. तेही त्यांनी स्विकारले. महाराष्ट्रातील कॉलेज आणि विश्वविद्यालयीन प्राध्यापकांचा एक मेळावा पुण्यात ठरला होता. त्याचे सकाळी १० वाजता उद्घाटन तर्कतीर्थांच्या हस्ते झाले. त्यासाठी ते वाईहून ८ वाजता निघाले. अध्यापक संघाच्या पदाधिकाऱ्यांनी प्रारंभी माहिती दिल्यावर तर्कतीर्थांनी आधुनिक राष्ट्रात कोणत्या विषयांना महत्व येत

आहे, शिक्षक व विद्यार्थी यांचे संबंध कसे असावेत, तरुण पिढीच्या कर्तृत्वाची आणि विकासाची जबाबदारी शिक्षकांवर कशी आहे याचे विवरण केले. त्या दृष्टीने प्राचीन भारतीय शास्त्रे व आधुनिक शिक्षणतज्ज्ञ यांचे विचार काय आहेत याचे त्यांनी मार्गदर्शन केले. पुण्यातील सर्वच क्षेत्रातील महत्त्वाची मंडळी आणि महाराष्ट्रभरचा प्राध्यापकवर्ग तेथे जमला होता. तर्कतीर्थ तासापेक्षा अधिक वेळ बोलले. तेथील जेवणासाठी न थांबता ते लगेच साताऱ्याच्या वाटेला लागले. म्हणजे पुढे ३ तासाचा उन्हाळ्यातील प्रवास. त्यांच्याकडे असलेल्या गाडीला वातानुकूलित यंत्रणा नव्हती. त्यांच्या गाडीचा चालक छोटू हा नेपाळी तरुण. त्याच्या गाडी चालविण्याच्या कौशल्यावर तर्कतीर्थांचा फार विश्वास होता.

साताऱ्याला संध्याकाळी ६ वाजता सभा होती. त्यापूर्वी साताऱ्याच्या रहदारी बंगल्यात चहापाणी, थोडी विश्रांती घेऊन ते सभेच्या जागी पोहोचले. विषय होता 'भारतीय संस्कृती आणि आधुनिक विज्ञान', रात्री ८च्या सुमारास सभा संपवून ते वाईच्या प्रवासाला निघाले. सातारा शहराची हद्द ओलांडली आणि त्यांची गाडी बिघडली. तर्कतीर्थ व त्यांच्या बरोबर प्रवास करणारे दोघे गाडीतून उतरून बाहेर उभे राहिले. तेव्हा साताऱ्याचे डॉ. देशपांडे बाहेरगावाहून साताऱ्यात परत चालले होते. त्यांनी गाडी थांबवून तर्कतीर्थांना घरी राहून जा, सकाळपर्यंत दुसऱ्या गाडीने वाईत जाण्याची व्यवस्था होईल म्हणून सांगितले. तर्कतीर्थांनी सांगितले की, वाईला गेले पाहिजे, मात्र त्यांनी साताऱ्याच्या एस्.टी. स्टँडवर सोडण्याची त्यांना विनंती केली. तेथून ते वाईच्या एस.टी. गाडीत बसून वाईला परतले, रिक्षाने पुन: स्वत:च्या घरी. अशा काही अडचणींचा अनुभव कधीकधी त्यांच्या वाट्याला आला पण त्यामुळे प्रवास नको असे कधी त्यांना वाटले नाही. सभांमध्ये त्यांच्या भाषणाला जो प्रतिसाद येत राहिला त्यानेच खरा त्यांच्या जीवनातील उत्साह टिकून राहिला.

१९८१ मध्ये अमरावतीला अखिल भारतीय दलित साहित्य संमेलन भरले होते. तेव्हां अध्यक्षस्थानी तर्कतीर्थ होते. त्यांनी आपल्या भाषणात २०व्या शतकापूर्वीच्या दलितांच्या सामाजिक स्थितीचे विश्लेपण केले. पिढ्यान्‌पिढ्या ओढगस्तीचे जीवन जगावे लागल्यामुळे त्या समाजवर्गाची, यातनांची जाणीव वोथट झाली होती. त्यांच्या मते दलितांची आत्मजाणीव पूर्णपणे झाकोळली होती. त्या वस्तुस्थितीला गुणकर्मावर विभागणी हे तत्व लागू पडत नाही. त्यांनी या संदर्भात शंबुक व एकलव्य यांच्या कथेकडे लक्ष वेधले. तर्कतीर्थांनी, युधिष्ठिर व अजागर यांच्यामधील संवादाचे तथ्य सांगून तशा प्रकारची वर्णव्यवस्था केव्हाच निकालात निघाल्याचे म्हटले. त्यांना

आताच्या दलितांमध्ये आत्मप्रकाश दिसू लागला. त्यांनी तेव्हां असेही म्हटले की, दलितांच्या आत्मविश्वासाला उभारी आली आणि त्यांचे साहित्य अंकुरले. हे घडले ते बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रेरणेने. आंबेडकर हे क्रांतिदूत असून त्यांच्या कार्याबद्दल कृतज्ञ असावे आणि दलितांनी यापुढे मर्यादारहित बंधनमुक्त विचार करण्यास शिकावे. सामाजिक संघर्षासारखी प्रक्रिया चालूच रहाते. त्यातील काही यशस्वी होतात तर काही फसतात. असमानतेने पोळलेल्या दलितांच्या साहित्यातून समानतेचा आदर्श उत्कटतेने व्यक्त व्हावा.

तर्कतीर्थांच्या अध्यक्षीय भाषणाला सर्वांनीच समाधानाची पावती दिली. सामाजिक विषमतेविरुद्ध तर्कतीर्थांची भूमिका ही स्वच्छ होती. त्याबद्दल कोणाला शंका नसे. पण काळाच्या ओघात अशा कर्तृत्वाचा विसर पडतो. हे पुढे ७/८ वर्षाच्या काळात दिसून आले. केवळ ११ महिने पंतप्रधान असलेल्या व्ही. पी. सिंग यांनी मंडल आयोगाचा अहवाल बारदानातून काढला. त्यावरील धूळ झटकून एका नव्या कार्यक्रमाला चालना देण्याचा त्यांचा हा खटाटोप होता. त्यांच्या घसरत चाललेल्या प्रतिमेला उजळा देण्याचा त्यांचा हा प्रयत्न.

व्ही.पी. सिंग यांच्या प्रस्तावावर आजपर्यंत समाजसुधारणांच्या बाबतीत पुढे असणाऱ्या अनेक गटांमधून तीव्र प्रतिक्रिया उमटल्या. 'हिंदुस्थानी आंदोलनाच्या' व्यासपीठावरून नानासाहेब गोरे, नानी पालखीवाला म्हणजे कायदेतज्ञ, मधु मेहता आणि तर्कतीर्थ यांनी त्या अहवालातील दोषांवर आणि अव्यवहारीपणावर निर्भिडपणे भाष्य करण्यास सुरवात केली. त्या अहवालातील शिफारसी अमलात आणल्यास सामाजिक प्रगतीचे चक्र उलट दिशेला फिरणार होते. शिक्षणक्षेत्रातील तंत्र, वैद्यक, विज्ञान यात आरक्षण पद्धतीने भरती केल्यास सामाजिक हानी होईलच पण प्राणहानीचे संकटही उद्‌भवते. त्या अहवालानुसार आरक्षणाखाली येणारा वर्ग थोडाथोडका नव्हे तर ४५ कोटींचा होता. इतक्या वर्गाचे कसे काय आरक्षण होणार! आरक्षित वर्गात आपली वर्णी लागावी म्हणून पुन: भ्रष्टाचार मोठ्या प्रमाणावर बोकाळणार.

तर्कतीर्थांच्या भाषणाचे वृत्त सर्व वृत्तपत्रात झळकू लागले. दलित समाजगटांचे नेतृत्व करणाऱ्या, उदा. नरेंद्र दाभोळकर व अन्य काहींनी तर्कतीर्थांना त्यांच्या निवासस्थानी गाठले. आपली विधाने मागे घ्या अन्यथा घरावर मोर्चे आणण्याची त्यांनी तर्कतीर्थांना धमकी दिली . तर्कतीर्थांची त्यांनी प्रेतयात्रा काढली. तर्कतीर्थ आता ९० वर्षांचे झाले होते. या कडव्या प्रतिकाराला सामोरे जाण्यास त्यांचे मनोधैर्य कमी पडू लागले. त्यांनी वृत्तपत्रकारांकडे एक सफाईवजा पत्र पाठवले. त्यात त्यांनी म्हटले होते

की, हळव्या बनलेल्या समाजाचे मन समजण्यात ते अपुरे पडले. आपली टीका काहिशी एकांगी होती. असेही त्यांनी सांगितले. तर्कतीर्थांच्या खुलाशाला तितकीच प्रसिद्धी मिळाली. वृत्तपत्रांनी त्यांच्यावर पुन: टीकेची तोफ डागण्यास सुरुवात केली. त्यांनी घूमजाव करून प्रस्थापित सरकारची मनधरणी केली असून त्यांच्याकडून आणखी वेगळी काय अपेक्षा करणार असा ह्या टीकेचा रोख होता. सत्य प्रिय नसले तरी ते बोलले पाहिजे या विश्वासातून धडाडीने ते आपले विचार वयाच्या ८० वर्षांपर्यंत मांडत राहिले. प्रचलित मतप्रवाह कितीही विरोधात असला तरी योग्य तेच ते बोलले. मात्र त्यानंतर अप्रिय सत्यावर मौन पाळावे लागणार हे त्यांच्या लक्षात आले.

डॉ. आंबेडकरांच्या जयंतीनिमित्त शासनाने त्यांचे अप्रकाशित लिखाण प्रसिद्ध करण्याचे ठरविले. त्यांचे त्यातील एक पुस्तक होते 'रिडल्स इन हिंदुइझम.' शासनाच्या त्या निर्णयाच्या बाजूने व विरोधात वृत्तपत्रांनी आपल्या आघाड्या उघडल्या. लोकसत्तेचे तेव्हाचे संपादक होते माधवराव गडकरी. एक निर्भिड आणि झुंजार असे वक्ते आणि लेखक. त्यांनी एका अग्रलेखात शासनाच्या त्या निर्णयावर तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केली. गडकरींचे म्हणणे होते, आंबेडकरांनी त्या पुस्तकात राम व कृष्ण या देवतांचा उद्धार केला आहे. वास्तविक त्या देवतांना हिंदूंच्या हृदयात शेकडो वर्षे स्थान आहे. त्यांच्या लेखानंतर त्या निमित्ताने त्या सर्व प्रश्नाला जातीय रंग दिले गेले. त्यामुळे राजकीय पटलावर नवे रंग चढले. माधवरावांनी त्या निमित्ताने तर्कतीर्थांची एक विस्तृत मुलाखत छापली. तर्कतीर्थांचे म्हणणे होते की, डॉ. आंबेडकरांना जे कूट प्रश्न (रिडल्स) असल्याचे वाटले त्यातील कित्येक सुटले आहेत. राम व कृष्ण यांच्याभोवती अनेक मिथ्यकथा या संस्कृतीत निर्माण झाल्या. मिथ्यकथांची म्हणजेच पुराणकथांची मोहिनी समाजमानसावर शेकडो वर्षे असते. अशा कथांत अद्भुत आणि सामाजिक मनाला धक्के देणारी सामग्री असते. ती सामग्री प्राचीन समाजस्थितीत आणि सामाजिक परिस्थितीत असते. त्यांचा अर्थ बदललेल्या काळात वेगळ्या पद्धतीने लावावा लागतो. अशा मिथ्यकथा सर्वच धर्मात आणि संस्कृतीत आढळतात.

यावर तर्कतीर्थांना पुन: टीकेला सामोरे जावे लागले. बाबासाहेबांचा अनुयायीवर्ग फार मोठा. संपूर्ण दलित समाजाचे ते दैवत. त्यामुळे बाबासाहेबांच्या त्या लिखाणावर निर्बंध म्हणजे विचार स्वातंत्र्यावर गदा असल्याचा प्रचार सुरु झाला. तर्कतीर्थ जातीयवादी आणि प्रतिगामी आहेत अशी मते मांडली जाऊ लागली. तर्कतीर्थांचे म्हणणे होते बाबासाहेबांचे अप्रकाशित म्हणून जे जे आहे त्याचे संशोधन झाले पाहिजे. त्यातील काही खरोखरच एके काळी बाबासाहेबांनी मुद्यांच्या स्वरुपात काढले

असेलही. त्यातील बाबासाहेबांचे किती आणि इतर काहींनी नंतर त्यात कोणी भर घातली की काय हे तपासले पाहिजे.

तर्कतीर्थांनी त्या संदर्भात जे म्हटले त्याला दुजोरा म्हणून त्याच वर्षी (१९८७) दुर्गाबाई भागवतांनी 'लोकसत्तेत' एक लेख लिहिला. दुर्गाबाई व्यासंगी आणि निर्भय लेखिका म्हणून प्रसिद्ध होत्या. दुर्गाबाईंनी म्हटले होते, प्राचीन धर्मग्रंथांची तपासणी आता होऊ लागली आहे. ती कशाप्रकारे करावी याचे काही निकष, तत्वे आहेत. त्यांनी पुढे म्हटले की, बाबासाहेबांनी ते निकष लक्षात घेतले नाहीत-धर्मग्रंथात मनुष्याची प्रतीके वापरून अगदी वेगळेच सुचवले गेलेले असते. ते लक्षात घेतले नाही तर त्या कथांचा खराखुरा वेगळा अर्थ नजरेसमोर येत नाही.

हिंदुधर्म व संस्कृतीच्या प्रथांमागील अर्थ, त्यातील रीतीरिवाजांचा अभ्यास तर्कतीर्थांनी आयुष्यभर केला. त्या संस्कृतीचा आशय त्यांनी जाणला. त्यावर त्यांचे विचार महत्वाचे समजले गेले. बाबासाहेबांबद्दल त्यांना नेहमीच आदर होता. बाबासाहेबांनी त्यांच्या मते, हे तेव्हां लक्षात घेणे जरुरीचे होते की, अस्पृश्यता समाजात पहिल्याप्रमाणे सांभाळली जात नाही आणि कायद्याने ती केव्हाच निकालात काढली. मनुस्मृती या ग्रंथात ती आहे पण त्याला शेकडो वर्षे होऊन गेली. इतर कौटुंबिक कायदे देखील नंतरच्या स्मृतींमध्येच बदलत गेले आणि नव्या हिंदू कायद्याने ते झुगारून दिले आहेत. तेव्हां इकडील हिंदुधर्म पालटत गेला आणि म्हणूनच तो टिकला. तर्कतीर्थांनी तेव्हां म्हटले होते की, 'इतिहासाची जाण पोटात ठेऊन हा धर्म सतत बदलत राहिला.'' म्हणून आता ती कोडी उरली नाहीत.

तर्कतीर्थांनी हिंदुधर्माचे कठोर परीक्षण पुन: केले होते. त्यातील काही चांगल्या पैलूंवर त्यांनी पुढे भर दिला. ते पैलू इतर धर्मात दिसत नव्हते. त्यांच्या मते, हिंदुधर्माचे तत्वज्ञान विश्वबंधुत्वाकडे नेणारे तत्वज्ञान आहे. ज्याला विश्वबंधुत्व समजत नाही तो कसचा हिंदू? जातीयवाद, अनोळखी जमातींबद्दल संशय व द्वेष, स्त्रियांची अवहेलना हे सर्व संस्कृतीत नेहमी होतेच. इकडील संस्कृतीत ते वेगळ्या प्रकारे उमटले एवढेच, त्यांना वाटत राहिले की, सुशिक्षित भारतीय माणूस आपल्या बुद्धीवर विश्वास ठेवतो. तो परंपरागत चालिरीतीचा आता बाऊ करीत नाही. हिंदू संस्कृतीत त्यांच्या मते जगाला देण्यासारखे बरेच आहे. ते म्हणजे उदा. आत्मजाणीव. भौतिक समाधाना-इतकेच आत्मज्ञानाचे समाधान महत्वाचे ठरते. भारतीय विचारातील आध्यात्मिक दृष्टिकोन आणि योगविद्येचे आकर्षण अजूनही इतर संस्कृतींना खुणवत असते.



# तर्कतीर्थ, ग्रंथ आणि ग्रंथालये

तर्कतीर्थांची वाचन व मननाची जागा म्हणजे चारीही बाजूंनी वेढलेल्या पुस्तकांच्या कपाटांच्या मधोमध असलेले त्यांचे भव्य टेबल व बाजूची खुर्ची. त्या टेबलावर जाड पारदर्शी काच होती. टेबलावर डाव्या उजव्या बाजूला कातडी बांधणीचे मोठे जाड ग्रंथ होते. त्यात ज्ञानेश्वरी, रामदासांचे अभंग असत. तसेच कांट, रसेल, रुसो, मिल यांच्या पुस्तकांची चळत असे. एवढ्याने भागत नसे. जोडीला जगातील प्रख्यात चित्रकारांच्या कलाकृतींची माहिती देणारी आणि त्यांच्या विख्यात चित्रांचे सुंदर फोटो असणाऱ्या जाडजुड पुस्तकराजांनी देखील त्याच टेबलावर ठाण मांडलेले होते. त्या पुस्तकांमागे वाचण्यास व टिपणे काढण्यास ते बसले की, चटदिशी कोणाच्या नजरेस पडत नसत. ते वाचनात दंग आहेत हे तेथे लागलेल्या दिव्यांवरून कळे. त्यांच्यासाठी चहा ठेवला गेल्यावर तो घेतला की, नाही हे पाहण्यास पुन: कोणाला तरी जावे लागे. बाहेरगावचे कार्यक्रम नसले की, दिवसेन्‌दिवस कित्येक तास ते अभ्यासिकेत गढलेले असत. दुपारी आडवे होणे वगैरे त्यांना माहीत नव्हते.

ते पुस्तकांची काळजी फार घेत असत. ग्रंथांची बांधणी कधी सैल पडली तर ते तप्तरतेने त्यांची बांधणी करवून घेत. पुस्तक वाचताना त्यावर काही खाणाखुणा करणे त्यांना आवडत नव्हते. एखादा ग्रंथ वाचल्यावर त्याचे मूल्य चटदिशी त्यांच्याकरवी पक्के होई. ग्रंथ वाचला म्हणजे तो इतका त्यांच्या लक्षात असे की, एखादा संदर्भ द्यावयाचा झाल्यास तो ते अचूकपणे देत. तो विचार व वाक्ये नेमकी कोणत्या पानावर आहेत हे ते निश्चितपणे सांगू शकत. ग्रंथ हे अक्षरात निबद्ध होतात म्हणून त्यांचे काम देखील चिरकाली असते असे त्यांचे म्हणणे असे. हाडामासाचा ग्रंथकार सरून गेला तरी त्याने लिहीलेले ग्रंथ कायम स्वरुपाचे असतात. पुस्तक हे संस्कृतीचे मस्तक असल्याचे त्यांनी म्हटले होते. जे पुस्तक आपल्या मस्तकावर धारण करतात तेच जीवनयात्रेत यशस्वी होतात. पुस्तकाला डाग पडू नयेत, ते आगीच्या भक्ष्यस्थानी पडू नये म्हणून जपावयाचे असते. पुस्तके या प्रकारे जपावयाचीच तसेच ती मूर्खांच्या

हातात पडू नयेत म्हणून देखील त्यांची काळजी घ्यावी लागते असे ते सांगत.

महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाची नियमित अधिवेशने भरत असत. त्यातील एक १९८२ साली वाईला होते. त्या अधिवेशनाचे ग. प्र. प्रधान हे उद्घाटक होते. तर रणजित देसाई हे अध्यक्ष. तर्कतीर्थ तेव्हा स्वागताध्यक्ष या नात्याने बोलले. आपल्या भाषणात त्यांनी पुस्तकांचे रक्षण किती कटाक्षाने केले जावे याविषयी सांगितले. त्यांनी म्हटले होते की, ते तेलापासून, पाण्यापासून जपले पाहिजे आणि खिळखिळे होऊ देता कामा नये. एवढे पुरे नाही तर धर्मवेडे, पंथवेडे आणि हुकुमशहा यांच्याकडून देखील पुस्तकाला कसे धोके असतात हे तर्कतीर्थांनी सांगितले. ॲलेक्झांडर हा जगज्जेता. त्याला पुस्तकांचे महत्त्व कळले होते. त्याने आपल्या ग्रीक संस्कृतीचा ऱ्हास होऊ नये म्हणून पुस्तके जपली पाहिजेत हे जाणले होते. मोठ्या विचारपूर्वक त्याने इजिप्तमध्ये नाईलच्या उगमाजवळ ॲलेक्झांड्रा ही नगरी वसवली व त्यात सर्वसंग्राहक असे ग्रंथालय उभे केले. अलेक्झांड्रा बंदर असल्यामुळे ते आंतरदेशीय दळणवळणाचे केंद्र बनले. ग्रीकांचे साहित्य म्हणूनच जगभर पसरले. जे लोक विचार पसंत नाहीत म्हणून पुस्तके नाहिशी करण्याचा उद्योग करतात ते समाजाचे नुकसान तर करतातच पण स्वत:चे देखील.

मुंबई मराठी ग्रंथालयाला १०० वर्षे होऊन गेली. नायगावच्या त्या ग्रंथालयात उत्तमोत्तम हजारो ग्रंथ, मासिके, वृत्तपत्रे संग्रहित केली आहेत. त्या ग्रंथालयाचे तर्कतीर्थांनी अध्यक्षपद स्वीकारले होते कारण त्या ग्रंथालयाच्या व्यवस्थापनेत अनेक कठीण अडचणी निर्माण झाल्या होत्या. त्या सर्व व्यवस्थेचे आर्थिक नियोजन राज्य शासनाच्या अखत्यारीत येत होते. शासनाने पुरेसे आर्थिक बळ दिल्याखेरीज सेवक वर्ग वाढवता येणार नव्हता आणि सेवेत असणाऱ्यांना योग्य वेतनही देता येत नव्हते. पुस्तके जपण्याची तेथील तऱ्हा पारंपारिक होती. या व्यवस्थेत मोठ्या सुधारणा केल्याखेरीज पुस्तकांचा मौल्यवान खजिना धोक्यात होता. तेथील 'साहित्यसंस्कृती' जपावी म्हणून तर्कतीर्थांनी तत्कालीन मुख्यमंत्री सुधाकरराव नाईक यांची अनेकवेळा गाठ घेतली होती. माननीय मुख्यमंत्र्यांनी २५ लाख रु. मदत देऊ केली. त्यांनी त्यातील रु. १० लाख लगेच ग्रंथालयाकडे पोहोचते केले होते.

तर्कतीर्थ पुण्यात असत तेव्हा इंटरनॅशनल बुक डेपोत नियमित चक्कर मारीत. नवीन विशेष चांगल्या पुस्तकांची निवड विश्वकोशाच्या ग्रंथालयासाठी ते करीत. मुंबईत त्यांच्या खेपा स्ट्रँड बुक स्टॉलमध्ये होत. शिक्षणाच्या प्रसाराचे मुख्य साधन म्हणजे ग्रंथालय. कितीही चांगल्या स्मरणशक्तीचा माणूस असे किती ज्ञान डोक्यात

साठवून ठेवेल! पुस्तके ते काम फार चांगल्या प्रकारे करतात. मुद्रणकलेने तर केवढी चांगली क्रांती केली. लक्ष्मणशास्त्री या संबधात म्हणत की, पूर्वी ग्रंथ मूठभर लोकांकडे व धर्मपीठांकडे असत. पण छपाईतंत्र आले आणि ज्ञान सर्व सामान्यांपर्यंत जाऊ लागले. त्यामुळे किती नव्या प्रकारचे साहित्य निर्माण झाले.

तर्कतीर्थ जेव्हा जेव्हा परदेशात गेले तेव्हा तेव्हा तेथील सार्वजनिक वाचनालये व विद्यापीठाची ग्रंथालये बघून येत. मोठ्या शहरातील प्रचंड पुस्तकभांडारात ते फिरून येत. पाश्चात्य संस्कृतीत नव्याने तयार होत असलेल्या ज्ञानप्रकाराबद्दल त्यांना फार उत्सुकता होती. शुद्ध विज्ञान व तंत्रज्ञानात कोणते देश आघाडीवर आहेत आणि प्रचलित काळात कोणते संशोधन अधिक मान्य होत आहे याची माहिती त्यांनी घेतली. अनुवंशशास्त्रातील नवे सिद्धांत त्यांनी समजावून घेतले. ह्यावेळी त्यांना एक खंत वाटत राहिली की, गणित व पदार्थविज्ञान चांगले शिकावयास हवे होते. त्याची पार्श्वभूमी नसल्यामुळे क्वॉंटम् मेकॅनिक्सचे सिद्धांत समजणे कठीण आहे याची रुखरुख त्यांना सतावत होती. तरीही त्यांनी आपल्या शास्त्रज्ञ मुलाकडून ते समजावून घेण्याचा प्रयत्न केला.

त्यांच्या नित्याच्या प्रवासात कपड्याची बॅग त्यांचा मदतनीस भरे. जोडीला पुस्तकांची एक स्वतंत्र शोल्डर बॅग मात्र ते स्वतः भरीत असत. बाहेरगावी कोणत्या विषयासंबंधी सभा आहे हे ते लक्षात घेत. त्यातील विषयाच्या अनुरोधाने तर्कतीर्थ बरोबर घ्यावयाची पुस्तके ठरवीत. काही पुस्तके मात्र नेहमीच जवळ बाळगीत. वाईत परत गेल्यावर बरोबरची पुस्तके ते स्वतः काढून जागच्याजागी ठेवीत असत. इतर कोणी तेव्हा मदत दिल्यास ते ती नाकारीत. परदेशाच्या प्रवासात ते स्वतःच्या पासपोर्ट आणि तिकीटाइतकीच पाठीवरील पुस्तकांच्या ओझ्याची काळजी घेत. १९९० ते ९३ सालच्या दोन अमेरिकेतील भेटीपासून परत येताना एअर इंडियाच्या स्टाफपैकी, कोणीही, त्यांना पुस्तकाचे ओझे कमी करण्यासाठी कस्टम्समधून बाहेर पडेपर्यंत कौतुकाने मदत करीत.

राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्ष असताना, तर्कतीर्थ प्रकाशनाला कोणते ग्रंथ योग्य आहेत हे स्वतः ठरवित. ते ग्रंथ ते नजरेखालून घालून त्यांचे मूल्यमापन करीत. त्यांच्या २० वर्षांच्या अध्यक्षीय कारकिर्दीत सहाशेच्यावर ग्रंथ, त्यांनी प्रकाशात आणले. त्यात अनुवादित पुस्तकांचा समावेश होता. साहित्य, धर्म, कला, तत्त्वज्ञान, विज्ञान आणि तंत्रज्ञान इ. सर्व शाखातील पुस्तकांना उत्तेजन त्या योजनेमुळे मिळाले. मिलचे 'ऑन लिबर्टी' हे महत्त्वाचे पुस्तक त्यांनी अनुवादासाठी

निवडले. ते काम त्यांनी व्ही. बी. कर्णिक यांच्यावर सोपवले. कर्णिकांच्या कामावर ते इतके खूष झाले की, त्याच्या प्रस्तावनेत त्यांनी म्हटले की, ''मराठी भाषेला व साहित्याला ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रात पश्चिमी भाषांचा दर्जा प्राप्त व्हावा, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन वा रशियन इत्यादी भाषांना जसे विद्यापीठीय स्तरावर स्वयंपूर्ण महत्त्व प्राप्त झाले आहे तसे मराठी भाषेला व साहित्याला प्राप्त व्हावे. इंग्रजी भाषेला व साहित्याला भारतीय विद्यापीठात जसे मुख्य स्थान आहे तसेच स्थान महाराष्ट्रातील विद्यापीठात मराठी भाषेला मिळवयास हवे.'' ज्या उद्देशाने त्यांनी साहित्य संस्कृति मंडळाचे काम चालू ठेवले होते त्याच उद्देशाने वाङ्मयनिर्मितीचा कार्यक्रम त्यांच्या मंडळाने हाती घेतला होता.

तर्कतीर्थांनी अशा प्रकारच्या वाङ्मयनिर्मितीत पाश्चात्य भाषेमधील मराठीत भाषांतरासाठी दोनशे पुस्तके निवडली होती. त्यात होमर, व्हर्जिल, एस्किलस, ॲरिस्टॉटल, अरिस्टोफिनीस, युरिपिडिस, न्यूटन, डार्विन, देकार्त, रुसो वगैरेंचा समावेश आहे. वि. के. राजवाडे आणि लो. टिळकांच्या लिखाणावर तर्कतीर्थांनी स्वत: पुस्तके संपादित केली होती. त्या दोन्हीही पुस्तकांना दीर्घ, व्यासंगपूर्ण प्रस्तावना त्यांनी लिहिल्या. 'बुद्धलीला' या ग्रंथाला त्यांची प्रस्तावना अशीच अभ्यासपूर्ण आहे.

तर्कतीर्थ जेव्हा प्राज्ञपाठशाळेत एक विद्यार्थी म्हणून वावरत होते तेव्हा व पुढे 'तर्कतीर्थ' या पदवीसाठी तयारी करत होते तोपर्यंत मांडी मोडून अध्ययन करत राहिले. परंतु त्यानंतर ते एक प्रभावी वक्ते म्हणून अधिक वावरले. त्यांचे आणि व्यासपीठाचे व जोडीला साहित्यिक व असाहित्यिकांनी गर्दी केलेला श्रोतृवर्ग यांच्यात एक स्वाभाविक अकृत्रिम असा दृढ संबंध जडला. धर्मशास्त्रे आणि अभिजात संस्कृत साहित्याच्या सखोल अभ्यासामुळे कोणत्याही नव्या सामाजिक वा धार्मिक समस्येच्या मुळाशी जाऊन विचार मांडणे त्यांना जमले. त्यांच्या बहुतेक भाषणांचा वृत्तांत वर्तमानपत्रात नीटपणे येत राहिला. भाषणे ध्वनिमुद्रित करण्याचा तो काळ नव्हता. १९८० नंतर काहीवेळा, काही प्रसंगी त्यांची भाषणे ध्वनिफितीवर रेखली गेली. त्यामुळे त्यांचे चहाते, मित्र, वृत्तपत्राचे संपादक जाहीरपणे आणि खाजगी रित्या म्हणू लागले की, तर्कतीर्थांचे विचारधन वाऱ्यावर उडून जाते. पण तर्कतीर्थ त्याकडे दुर्लक्ष करीत. रंगभूमीवरील अभिनेत्यांना जसा समोरचा प्रेक्षकवर्ग त्याचे बलस्थान वाटतो तसेच बहुतेक तर्कतीर्थांच्या बाबतीत घडे. समोर बसलेले जाणकार, रसिक आणि उत्सुक सामान्यजन त्यांना दिसत तेव्हा त्यांची वाणी व विचार आणखी खुलत. आदि शंकराचार्यावर तर्कतीर्थांनी चरित्र लिहावे म्हणून त्यांना अनेकजण आग्रह

करत होते. त्यांनी शंकराचार्यांची संस्कृतमध्ये लिहिली गेलेली सर्व चरित्रे मिळवली. त्यासंबंधी काही माहिती दक्षिणेकडील शंकराचार्यांचे पीठ असलेल्या व तेव्हा शंकराचार्य असलेल्या आचार्यांना प्रत्यक्ष भेटून घेतली. टिपणे तयार केली. परंतु प्रत्यक्ष लिहिण्यास तर्कतीर्थांनी सुरुवात केली नाही. शंकराचार्यांची उपनिषदांवरील भाष्ये किंबहुना त्यांचे सर्व अद्वैतपर तत्त्वज्ञान तर्कतीर्थांच्या स्मरणात होते. अखेर त्याविषयी त्यांनी बोलण्याचे मान्य केले. १९९१ च्या जानेवारीत दादरच्या राजा शिवाजी विद्यालयातील प्रगत संशोधन केंद्रात त्यांनी ३ व्याख्याने दिली. प्रतिष्ठित व उच्चशिक्षित आणि विश्वविद्यालयाचे विद्यार्थी, प्राध्यापक हे मोठ्या संख्येने हजर होते. व्याख्यानाच्या शेवटी अनेकांनी प्रश्न विचारले व त्यावर प्रत्युत्तर तर्कतीर्थ तसेच मे. पु. रेगे देत होते. शंकराचार्यांच्या जीवनाभोवती अनेक मिथ्यकथा गुंफल्या गेल्या आहेत. त्या सर्वांचे निराकरण करीत सरळ ऐतिहासिकदृष्ट्या त्यांचे जीवन कसे रेखाटता येते यावर ते बोलले. बौद्ध तत्त्वज्ञान भारताच्या वैचारिक इतिहासात आपले तत्त्वज्ञान इतक्या प्रभावीपणे सर्वांपुढे मांडणारा विचारवंत शंकराचार्यांसारखा दुसरा कोणी झाला नाही. स्वत: शंकराचार्य व सुरेश्वरासारखे त्यांचे शिष्य ठिकठिकाणी फिरून वेदांत धर्माची घडी बसवण्याच्या कामात गर्क होते. बौद्ध संघ जसे फिरत असत तसे ते फिरत होते. तर्कतीर्थांच्या मते आपल्या आश्रमात बसून धडे देण्यापेक्षा धर्माचा उपदेश देत फिरणे आचार्यांनी पसंत केले. लोकांना मोक्षाची ओढ असते. त्यांना दु:खातून बाहेर पडावयाचे असते. त्या सर्वांसाठी त्यांच्या दु:खाचा मार्ग उजळून टाकण्यासाठी शंकराचार्यांनी जागोजागी जाण्याचा उपक्रम ठरवला. त्यामुळे जनमानसावर त्यांच्या विचाराचा लक्षणीय प्रभाव पडला. आजही आहे. तर्कतीर्थांची ही भाषणे ध्वनिमुद्रित केली गेली होती. त्यांच्या निधनानंतर ५ वर्षांनी ती संपादित होऊन पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली.

त्यांच्या व्याख्यानाच्या धारा नित्य बरसत राहिल्या. उपनिषदात माणसाला जे वाणीचे वरदान लाभले आहे त्याचे फार कौतुक येते. वाणी म्हणजेच माणसाला निर्माण करता आलेली भाषा. ती वापरता येते म्हणून ज्ञान वाढीस लागते. म्हणूनच वाणीला ब्रह्म समजून तिची उपासना करावी असे त्या उपनिषदाच्या द्रष्ट्याचे म्हणणे होते. तर्कतीर्थांची ती उपासना फार महत्त्वाची होती.

द्वा. भ. कर्णिकांनी लिहिले होते की, शास्त्रीजींचे जीवन पॅनोरामाप्रमाणे अनेक रंगांच्या छटांमध्ये भव्य व देखणे झालेले दिसते. धोतर व वर उघड्या अंगावर शाल लपेटून कराडमध्ये कृष्णा-कोयनेच्या संगमाच्या बाजूच्या विस्तीर्ण घाटावर गांधींच्या

सत्याग्रहासंबंधी भाषण देणारे शास्त्रीजींचे एक रूप दिसते. पुढे गांधींचे पुत्र देवदास आणि राजगोपालाचारींची कन्या लक्ष्मी यांच्या विवाहाचे पौरोहित्य करताना लगबग करणारे शास्त्रीजींचे आणखी एक रूप. गांधींसारख्या कीर्तिमान नेत्याने त्यांच्या विचारांवर जो विश्वास टाकला होता तेव्हा एक विशेष समाधान आणि प्रसन्नता त्यांच्या मुद्रेवर दिसत होती. म. गांधी येरवडा जेलमध्ये बंदिस्त असताना रोज सकाळी १० वाजता तर्कतीर्थांना सल्लामसलतीसाठी बोलावून घेत. तेव्हा हा कोण तरुण शास्त्री गांधींच्या इतक्या जवळ वावरत असतो यावर इतरांच्या चेहऱ्यावर कधी कौतुकाचे तर कधी असूयेचे भाव उमटत. ते तर्कतीर्थांचे वैभव होते. त्या वैभवाकडे त्यांनी रॉयवादी पक्षात प्रवेश करून पाठ फिरवली. विद्वानांमध्ये ते विद्वान असल्यामुळे तात्त्विक झटापटीत त्यांनी कधी माघार घेतली नाही. पण समाजातील इतर सर्वच थरात मिसळतांना त्यांच्या विद्वत्तेचे ओझे कुणाला जाणवले नाही.

तर्कतीर्थांनी भारतीय सर्व तत्त्वज्ञान प्रणालींचा सांगोपांग अभ्यास केला होता. त्या त्या तत्त्वदर्शनांचे जे आद्य ऋषि होते, त्यांची सूत्रे, त्यावरील टीका आणि भाष्य सर्व त्यांच्या स्मरणात टवटवीत राहिले. त्यांनी इंग्रजी भाषा शिकली तेव्हा पाश्चात्य तत्त्वज्ञान नीटपणे वाचून घेतले. इकडील तत्त्वज्ञान मांडण्याची एक विशिष्ट परंपरा होती. भारतीय तत्त्वज्ञानात सत्य हे कधी खोडता येणार नाही अशा पद्धतीने मांडले जाई. त्या मांडणीत तार्किक बिनचूकपणा असे. तरीही येथील दर्शन परंपरा परस्परविरोधी देखील होती. याचे कारण त्यांचे मुख्य गृहीतक वेगवेगळे होते. दर्शने वाचताना आकर्षक वाटत आणि त्यांच्याबद्दल आदर देखील वाटे. आदराची भावना निर्माण झाल्यामुळे ती श्रध्देय ठरत. भारतात तत्त्वज्ञान वेगवेगळ्या रुपात निर्माण होत गेले. तसेच ग्रीसमध्ये देखील. ग्रीक तत्त्वज्ञान आणि भारतीय तत्त्वज्ञान प्राचीन काळी समांतरपणे घडत गेले. मात्र त्यानंतर त्यांच्यात फार मोठा फरक पडला.

तर्कतीर्थांनी या दर्शनात्मक वैचित्र्यावर बराच विचार केला. ग्रीक तत्त्वज्ञानावर पश्चिमी वळणाच्या काळानुरूप अनेक वेगवेगळ्या तत्त्वप्रणाली उभ्या राहिल्या. दुसऱ्या महायुद्धानंतर फार नवे सामाजिक प्रश्न निर्माण झाले. समाजमानसात फार बदल झाले. तेव्हा त्या प्रश्नांची दखल घेऊन जीवनाभिमुख अशी तत्त्वज्ञाने पाश्चात्य विचारवंतांनी मांडली. नव्या सामाजिक अनुभवांचा अर्थ सांगणारी, त्यांचे स्पष्टीकरण देणारी अशी तत्त्वज्ञाने तयार होत गेली. तत्त्वज्ञान हे जीवनदर्शन घडवणारे असावे असे तर्कतीर्थांना वाटले.

इकडे भारतीय संदर्भात तसे काही घडले नाही. अंतिम सत्य आपल्याला गवसले

असा दावा करीत तत्त्वज्ञाने कृतार्थ भावनेला कवटाळत बसली. त्यामुळे प्रगती होण्याची शक्यता उरली नाही. तर्कतीर्थांनी या संदर्भात 'नवभारत' मध्ये (१९५२) एक विस्तृत लेख लिहीला होता. भारतीय विद्यापीठात तत्त्वज्ञान विभागात शेकडो प्राध्यापक पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील तत्त्वज्ञान शिकवत असतात. शेकडो विद्यार्थी प्रतिवर्षी त्या विषयात पदवीधर होऊन बाहेर पडतात. महाविद्यालये आणि विश्वविद्यालयात अध्यापन करून गेलेल्या व अजूनही करत असलेल्या या मंडळीत तत्त्वज्ञानाबाबत काही नव्याने विचार व्हावयास हवा अशी जाणीव दिसत नाही. नव्या दार्शनिक युगाची सुरुवात होईल अशी प्रवृत्ती औषधालाही सापडत नाही. हे कृतार्थतेचे तरी लक्षण आहे नाहीतर बुद्धीच्या कमकुवतपणाचे. तर्कतीर्थांच्या मते, तत्त्वज्ञान हे सामाजिक अनुभवांचा व विचारांचा बुद्धीने घेतलेला वेध असते. जीवनातील नव्या प्रश्नांशी व नव्या घटनांशी पारंपारिक तत्त्वज्ञानाचा संवाद होईनासा झाला. ही इकडील तत्त्वज्ञानाची दुर्बळ अशी बाजू आहे. आधुनिक तत्त्वज्ञानाला सामाजिक अडचणीतून मार्ग काढता आला पाहिजे. त्यासाठी आजचे विज्ञान कोणत्या दिशेने चालले आहे हे देखील समजावे लागते. श्रद्धेपेक्षा विचाराचे सामर्थ्य अधिक असते हे ओळखावे लागते. काहीजण अध्यात्माचा उदोउदो करतात व जोडीला वेषही बदलतात. अशी अध्यात्माची भाषा एक प्रकारचे ढोंग असते. हे सर्व बुवाबाजीला पुरेसे होते असे तर्कतीर्थांना वाटले.

तर्कतीर्थांच्या लेखांमध्ये तसेच भाषणात विज्ञानवादावर नेहमीच भाष्य डोकावे त्यात स्वाभाविक धार्मिक वृत्ती आणि वैज्ञानिक मनोवृत्तीची तुलना होई. धर्म टिकतो कारण उपासकांची तशी श्रद्धा असते. त्या श्रद्धेमुळे सर्व उपासकांना धर्म एकत्र ठेवतो म्हणजेच धर्मामुळे इतर धर्मापेक्षा वेगळेपण जोपासले जाते. विज्ञानाचे तसे नसते. विज्ञान कधी सर्व सत्य कायम मिळाल्याचा दावा करीत नाही. ते तर विज्ञानाच्या दृष्टीतून आत्ता समजले आहे ते इतकेच असे मानते. पुढे नव्याने काही उजेडात येईल अशा धारणेने विज्ञान पुढे जाते. ते नेहमी सावधगिरीचा इशारा करते. सत्य शोधण्याच्या दिशेने विज्ञान आपला मार्ग नेहमी खुला ठेवते.

मार्क्सवादाचे काही दशके जे कौतुक झाले ते ते सामाजिक विज्ञान असल्याचे समजून. वैज्ञानिक सिद्धांताचा त्याला दर्जा दिला गेला होता. मार्क्सवादाची भुरळ आधुनिक युरोपीय द्रेशांना भारतातील अनेक विद्यावंतांना पडली होती. तर्कतीर्थ तो फार चांगल्याप्रकारे समजावून देत आणि त्याची समीक्षाही तितक्याच सडेतोडपणे करीत असत. नवभारत मासिकात त्यांनी त्यावर तीन महत्त्वाचे लेख लिहिले होते.

तर्कतीर्थांना वाटत राहिले की, मार्क्सवाद व त्यावर आधारलेला समाजवाद प्रचलित धर्माच्या विरोधात असूनही धर्मश्रद्धेप्रमाणे त्याची लोकांवर पकड बसू लागली. त्यामुळे मार्क्सवादाची समीक्षा होणे जरुरीचे होते. कोणतीही विचारप्रणाली श्रद्धेचा विषय होऊ लागली की, वैज्ञानिक दृष्टी दुबळी होऊ लागते. मार्क्सवादाचे तत्त्वज्ञान हेगेलच्या विरोधविकास पद्धतीवर उभे राहिले होते. पण आंतरविरोध किंवा समाजाच्या विविध वर्गांमधील संघर्ष प्रगती घडवून आणेलच असे निश्चितपणे सांगता येत नाही. उलट संघर्षात अडकलेले वर्ग क्षीण होऊन सामाजिक प्रगती धोक्यात येऊ शकते. रॉय यांनी अनेकवेळा म्हटले होते की, विरोधविकासपद्धती नीती व राजनीती यात काडीमोड घडवून आणते. मार्क्सप्रणीत सामाजिक बांधणीत मनुष्याच्या अनेक प्रकारच्या मूल्यांना नकार आहे. त्यात शुद्ध विज्ञानाची गरज नाकारली आहे. मार्क्सछापाचा समाजवाद म्हणजे अव्यवहारी आणि पोकळ पांडित्य असल्याचे त्यांचे प्रतिपादन होते. उत्तम कलानिर्मिती, तिचा आस्वाद, नैतिक प्रेरणा या प्रकारच्या मानवी मनाला विशेष महत्त्व वाटणाऱ्या मूल्यांना त्यात स्थान नाही.

तर्कतीर्थांचे वैचारिक जग फार विस्तृत होते. धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय साहित्यिक, भाषा, भाषावृद्धी या सर्वच क्षेत्रात ते सहजपणे वावरत. त्यांच्याकडे म्हणजे प्राज्ञपाठशाळेकडे आचार्य शंकरराव देवांनी 'नवभारत' हे मराठी मासिक चालवण्यासाठी सोपवले, सन १९४९ मध्ये. ते प्रामुख्याने बौद्धिक म्हणजेच वैचारिक स्वरुपाचे होते. सुरुवातीला त्यात ज्या विषयांवर लेख प्रसिद्ध होत असत त्यावर थोडी थट्टाही केली जाई. अनेकांचे म्हणणे असे की, 'नवभारतात' प्राचीन भारताचे दर्शन अधिक घडते. तर्कतीर्थांच्या अध्यक्षतेखाली त्यात अनेक विषयांवर प्रसंगानुरूप विशेषांक निघत. गांधी जन्मशताब्दिनिमित्ताने म. गांधींवर अनेक विचारवंतांच्या लेखणीतून त्यात लेख प्रसिद्ध झाले होते. संत ज्ञानेश्वरांना ३०० वर्षे झाल्यावर त्यावर 'नवभारत'चा विशेष अंक निघाला तसाच एके वर्षी मद्य व मद्यपान रिवाजांवर. माहितीपूर्ण तसेच हलकेफुलके लेख त्यात असल्यामुळे तो अंक हातोहात खपला. प्राज्ञपाठशाळेने चालवलेल्या त्या मासिकाचे संपादक तर्कतीर्थ नंतर गोवर्धन पारीख, मे. पु. रेगे, वसंतराव पळशीकर यासारखे एकेक विचारवंत व लेखक होते. ते मासिक अजूनही चालू आहे.

नवमानवतावादींनी सुरुवातीला जसे 'इंडिपेंडंट इंडिया' हे साप्ताहिक सुरू केले होते तसेच 'संग्राम' हे दैनिकही. या दैनिकाच्या संपादनाची जबाबदारी द्वा. भ. कर्णिक व मा. पं. शिखरे यांच्याकडे होती. तर्कतीर्थ, पारीख व इतर रॉयवाद्यांकडे पक्षाच्या

प्रसाराचे काम मुख्यत: सोपवले गेले होते. तरीही तर्कतीर्थांना कधी स्वस्थ बसवले नाही. मुंबईत त्यांच्या 'संग्राम'च्या कचेरीवर चकरा असत. तेथे गप्पा सुरू होत. त्यात अवचित एखादा विषय पुढे आल्यावर तर्कतीर्थांचे त्यावरील विचार अचानक जोरात आलेल्या पावसाच्या सरीप्रमाणे प्रकट होत. मग डी. बी. कर्णिक त्यांना म्हणत 'शास्त्रीजी या विषयावर तुमचा लेख तयार करूया.' तर्कतीर्थ बोलत रहात आणि मा. पं. शिखरे आपल्या सुंदर अक्षरात ते सर्व उतरवून घेत. आधी न योजलेल्या विषयांवर तर्कतीर्थांकडून लेख त्यांच्या हाती पडे. कधी अग्रलेख, कधी स्फुटे तर कधी ललित लेख. नामांकित पाश्चात्य चित्रकलाकारांवर मायकल अँजलो, गोया, राफेल, पॉल सिझाने, रेनॉयर वगैरेंच्या कलाकृती, शैली यातील आशय आणि कलाकारांच्या व्यक्तिगत जीवनावर तर्कतीर्थांनी लिहिलेले लेख 'संग्राम' च्या रविवारच्या अंकात प्रसिद्ध होत असत. त्या अंकांकडे वाचकांचे लक्ष लागलेले असे. मात्र ३/४ वर्षात 'संग्राम'ला आर्थिक झळ सोसावी लागली. दुर्दैवाने त्या कचेरीवर टाच आल्यामुळे 'संग्राम' चे सर्वच अंक कोठे कसे गेले हे कळले नाही! त्याबरोबर तर्कतीर्थांचे ते ललित लेखही नाहिसे झाले. तर्कतीर्थ अनेक वर्षे 'प्रमोद', 'चित्रा', 'धनुर्धारी', 'किर्लोस्कर', 'मौज' वगैरे मासिकांसाठी लेख लिहित होते. त्यांच्या या अनेक लेखांमध्ये तत्कालीन महत्त्वाच्या घडामोडी जगात ज्या घडत असत त्याचे भान होते. २० व्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात फार महत्त्वाच्या सामाजिक घडामोडी घडत होत्या. त्या सुधारणांच्या प्रक्रियेत एक कणखर समाजसुधारक अशी भूमिका तर्कतीर्थ निभावत होते. एक बौद्धिक आणि उदारमतवादी प्रकारचे नेतृत्व त्यांनी दिलेले दिसते.

१९०१ ते १९९४ या कालखंडातील त्यांचे जीवन. त्यात निर्माण झालेल्या राजकीय व सामाजिक चळवळींचे ते साक्षीदार होते. परंतु ते निव्वळ साक्षीदार होते असेही नव्हे. त्या चळवळींकडून त्यांना प्रेरक शक्ती मिळाली होती. पुढे त्या चळवळींना त्यांनी बळ दिले. ह्या सुधारणांचे ते भाष्यकारही राहिले. त्यातील यशापयशाचे त्यांनी मोजमाप केले. अखेरच्या २/४ वर्षात त्यांच्या मनाला कधी म. गांधींची साथ सोडल्याची टोचणी वाटली. त्यावर अर्थात प्रकटपणे इतरांशी ते बोलले नाहीत. त्यांना खेद वाटला तो एवढ्या-साठीच की गांधीजीच्या नैतिक नेतृत्वाची गांधीयुगातच घसरण झाली.



# भारतीय संस्कृतीचे एक भाष्यकार या भूमिकेतून

तर्कतीर्थांचा, राज्यशासनाच्या योजनेखाली असलेल्या 'साहित्य संस्कृति मंडळ' या मंडळाशी असलेला संबंध औपचारिकरित्या संपला खरा. तथापि संस्कृती, विशेषत: भारतीय संस्कृती हा त्यांचा प्रथमपासून जिव्हाळ्याचा विषय राहिला होता. नुसता जिव्हाळ्याचा नव्हे तर व्यासंगाचा देखील. त्यावरील त्यांचे चिंतन संपण्याचे कारण नव्हते. त्यांच्या सर्व लिखाणात म्हणजे अगदी १९३८ मध्ये लिहिलेल्या 'आनंद मीमांसा' या प्रबंधापासून सर्व लिखाणात आणि भाषणांत त्यावरील भाष्य नेहमीच डोकावत राहिले. पारंपारिक धर्मशास्त्रे व दर्शने तयार झाल्यावर पंडितांना आपापल्या दर्शनाचा अभिमान असे. त्या अभ्यासातून बुद्धीला तर्कसंगतीची छान शिस्त लागते. विश्लेषण व मीमांसा या वादपद्धती त्यांना चांगल्या जमतात. परंतु आपल्या शास्त्राच्या पलिकडे जाऊन विचार करणे त्यांना बहुधा जमत नाही. त्यांना आपापल्या शास्त्रापलिकडील ज्ञानाचे वावडे असते. तर्कतीर्थांच्या बाबतीत तसे घडले नाही. याचे कारण अर्थात समंजस आणि आधुनिक विचारसरणीचे गुरू त्यांना भेटले.

विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात समाजातील अनेक आसामी आणि विद्वानही आपल्या अवतीभवती काय चालले आहे यात रस घेऊ लागले होते. तर्कतीर्थ त्या नव्या डोळस प्रवृत्तीचे उत्तम प्रतिनिधी ठरतात. आधुनिक भारताच्या धार्मिक-सामाजिक आणि राजकीय आंदोलनात ते पहिल्या उमेदीपासून एकरूप होऊ लागले होते. ते पंडितांच्या सभांच्या परिघातही अडकले नाहीत. त्यांच्या एकरुपतेचे वैचारिक स्वरूप त्यांच्या लेखात स्पष्टपणे उमटते. कोणतेही ज्ञान मानवी जीवनावर कसा प्रभाव करते याचा ते वेध घेत. ज्ञान हे समाज जीवनाच्या कोणत्या ना कोणत्या अंगाला उजळणारे असावे असे त्यांचे मत होते. म्हणूनच धर्मविषयक ज्ञानही समाजाच्या दृष्टीने अर्थपूर्ण आहे की, नाही याचा त्यांनी तपास घेतला. जुन्या

धर्मशास्त्रांमधून नव्या सामाजिक सुधारणांसाठी आधार देता येतात हे त्यांनी म. गांधींच्या नजरेस आणून दिले. ते गांधींच्या अस्पृश्यता निवारणाऱ्या कार्यक्रमास विशेष मदत करीत होते. गांधी तत्त्वज्ञानापासून मार्क्सच्या साम्यवादाकडे आणि तेथून नवमानवतावाद या तत्त्वप्रणालीकडील त्यांच्या विचारांच्या प्रवासाला एकच निकष लावता येतो. तो म्हणजे सामाजिक प्रगती त्यामुळे सिद्ध होते की, नाही हा होय. पांडित्य हे समाजाभिमुख हवे याविषयी ते ठाम होते.

या संबंधात २०व्या शतकातील एका महत्त्वाच्या पश्चिमी विचारवंताची आठवण होते. तो म्हणजे बर्टांड रसेल. रसेल हा अतिशय मार्मिक शैलीने लिहिणारा. तो सुशिक्षित वाचकवर्गात जेवढा लोकप्रिय तितकाच त्याचा मान गणितज्ञ, तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ यांच्या वर्तुळात होता. गणितावर संशोधनपूर्वक ग्रंथ त्याने व्हाइटहेडसमवेत लिहिला, 'प्रिंसिपिया मॅथेमॅटिका' या नावाचा. तत्त्वज्ञानात महत्त्वाच्या समजल्या गेलेल्या विषयांवरही त्याने पुष्कळ मोलाचे ग्रंथ लिहिले. परंतु त्यानंतर त्या विद्याशाखांमधून तो बाहेर पडला आणि तत्कालिन सामाजिक समस्यांवर म्हणजे शिक्षणपद्धती, विवाहसंस्था आणि नैतिकता, ख्रिश्चन धर्मसंस्था वगैरे विषयांवर पुस्तके लिहिण्याचा सपाटा त्याने लावला. अण्वस्त्रबंदीसाठी निदर्शने करून वयाच्या ८९ व्या वर्षी त्याने तुरुंगवासही सोसला. त्याचे ज्ञान त्याला सामाजिक संदर्भात कसे वापरता येईल यावर त्याने आपले अर्धेअधिक आयुष्य घालविले.

तर्कतीर्थ आधुनिक भारताच्या अतिशय समृद्ध कालखंडात वावरले. अहिंसावाद आणि क्रांतिवाद, साम्यवाद आणि समाजवाद अशा प्रकारच्या विविध प्रवृत्तींचे सामाजिक तत्त्वज्ञान तेव्हा तेथे जोमाने मांडले जात होते. तर्कतीर्थांनी सर्व प्रणालींच्या सिद्धांताचा अभ्यास केला. जेथे जेथे त्या प्रकारची समाजव्यवस्था आली त्यातील दोष प्रकट होऊ लागले होते. त्या राजकीय तत्त्वविचारांनी जे जे आश्वासिले त्यापेक्षा प्रत्यक्ष परिस्थिती फार वेगळी होती. त्यापैकी कोणतीच विचारसरणी समाधान देणारी नव्हती. तर्कतीर्थांनी स्वत:च म्हटले होते की, अतिशय प्रत्ययकारी विविध विचारप्रवाहात ते भिरभिरत होते. त्या वेगवान प्रवाहात पाय स्थिर ठेवण्यासाठी ते धडपडत होते. त्यांना अपेक्षित असे सामाजिक तत्त्वज्ञान अखेर मिळाले ते त्यातल्या त्यात रॉयप्रणीत नवमानवतावादात. तर्कतीर्थांच्या संबंधात प्रा. रा. ग. जाधव यांनी म्हटले होते की, ''शास्त्रीजी हे विसाव्या शतकाच्या प्रथमार्धाचे एक नमुनेदार (टिपिकल) भारतीय विचारवंत होत.'' याचे कारण कोणतीच तत्त्वप्रणाली त्यांनी अखेरचे सत्य असल्याचे मानले नाही. सुधारणावादी काय, गांधीजी काय किंवा

मार्क्सची सामाजिक तत्त्वप्रणाली काय कोणालाही एक विधायक सर्वंकष सामाजिक तत्त्वज्ञान मांडता आले नाही. त्या सर्वांच्या विचारात तर्कतीर्थांना अपुरेपणा जाणवला. म्हणूनच तर्कतीर्थांनी आपली विचारसरणी पुन:पुन: तपासली. तपासाअंती एकएक सोडून दिली.

तर्कतीर्थांनी कोणत्याच विचारसरणीची बांधिलकी मानली नाही. त्यांनी आपले मन नव्याने पुढे येणाऱ्या ज्ञानप्रवाहांसाठी मोकळे ठेवले होते. गांधींच्या राजकीय तत्त्वज्ञानावर व साधनशुचितेवर त्यांनी मनापासून काही वर्षे प्रेम केले. त्याचा प्रसार केला. पण त्यातील अडचणी लक्षात येऊ लागल्यावर ते त्यातून बाहेर पडले. तसेच मार्क्सवादाचे त्यांना आकर्षण वाटले, मार्क्सवादावर ते चांगले भाष्य करीत. त्यावर चांगले लेखही त्यांनी लिहिले. पण त्यातील धोके लक्षात आल्यावर त्यापासून ते दूर झाले. पुन: एकदा रसेलची आठवण होते. रसेलने तत्त्वज्ञानात आपली भूमिका काही वेळा बदलली. सुरवातीला तो चिद्वादी आणि एकतत्त्ववादी होता, मग बहुतत्त्ववादाचा पुरस्कर्ता झाला. त्यानंतर तो वास्तववादी म्हणजे (रिॲलिस्ट) राहिला. त्यामुळे रसेलचे अमुक एका सिद्धांतावर काय मत आहे असे विचारल्यावर प्रतिप्रश्न येई कोणत्या काळातील त्यांच्या मताबद्दल ही विचारणा आहे! तर्कतीर्थ आपली बौद्धिक भूमिका बदलतात असा त्यांच्यावर काहींचा आक्षेप असे.

तर्कतीर्थ ज्या परंपरेत शिकले तेथेच त्यांना विचार-स्वातंत्र्याचे आदर्श भेटले. वैदिक व अवैदिक दर्शनपरंपरांची विविधता तेथे होती. पाश्चात्य ज्ञानप्रवाहांचे चांगले वाचन झाल्यावर त्या इकडील आणि पश्चिमेकडील विद्यांचा त्यांनी चांगला मेळ घातला. त्यामुळे त्यांना हिंदुधर्माची अतिशय वस्तुनिष्ठ अशी चिकित्सा करता आली. धर्मतत्त्वज्ञान आणि सामाजिक चालीरितींमध्ये योग्य फरक करावा लागतो. धर्मश्रद्धांचा व्यक्तिच्या व समाजाच्या जीवनातील प्रभाव कमी झाल्याखेरीज हिंदी समाज प्रगती करू शकणार नाही असे त्यांचे म्हणणे होते. एम्. एन्. रॉय यांनी तर्कतीर्थांची जी साकल्याने विचार करण्याची पद्धती होती त्याबद्दल फार गौरवोद्गार काढले होते. ते म्हणाले होते की, शास्त्रीजी 'इज् दि बेस्ट प्रॉडक्ट ऑफ् इंडियन रेनेसान्स' - शास्त्रीजी हे भारतीय प्रबोधनाचे उत्तम प्रसादचिन्ह आहे. असेच अगेहानंद या सिरॅक्युज युनिर्व्हसिटीत पौर्वात्य ज्ञानशाखेत प्राध्यापक असलेल्यांचे मत होते. अगेहानंदांनी आपल्या पुस्तकात तर्कतीर्थांबद्दल असेच गौरवाने म्हटले आहे.

तर्कतीर्थांनी 'वैदिक संस्कृतीचा विकास' या ग्रंथात भारतीय संस्कृतीची संक्रमणे विदित केली आहेत. म्हणजे इ.स.पू. १५००च्या पूर्वीच्या द्राविडी संस्कृतीपासून

भारतीय स्वातंत्र्यापर्यंतच्या तीन हजारांपेक्षा अधिक वर्षांचा अशा कालौघाचा विचार त्यात मांडला आहे. तो एवढ्यासाठी की, संस्कृतीचा इतिहास लक्षात न घेतल्याखेरीज वर्तमान समाजाच्या प्रवृत्ती कळत नाहीत. शिवाय भविष्यकालीन समाजसंस्कृतीची दिशाही लक्षात येत नाही. हे त्यांनी इतिहासाच्या तत्त्वज्ञानाच्या आणि मानवजातिशास्त्राच्या दृष्टिकोनातून केल्याचे स्पष्टपणे मांडले आहे. हिंदुधर्म समीक्षा करतांना त्यांनी मार्क्सवादी उपपत्तीतून विचार केला तर नंतर दहाएक वर्षांनी लिहिलेल्या ग्रंथासाठी वेगळ्या मानविकी शास्त्रांचा उपयोग केला. म्हणजे त्या ग्रंथांच्या मांडणीत वापरलेल्या पद्धती वेगवेगळ्या होत्या. इतक्या दीर्घ भूतकाळ असलेल्या संस्कृतीवर सांगोपांग लिहावयाचे हे काम सोपे नव्हते. एवढा प्राचीन काळ लाभलेली जगात दुसरी संस्कृती एकच ती म्हणजे चीनची.

संस्कृतीची एक नीटस अशी व्याख्या तर्कतीर्थांनी केली आहे. मनुष्य आपल्या व्यक्तिश: व सामाजिक प्रयत्नांनी जी जीवन पद्धती निर्माण करतो ती संस्कृती होय. आपले जीवन अधिक यशस्वी व्हावे म्हणून तो स्वत:वर व बाह्य विश्वावर बदल करत रहातो. हे संस्कार करतांना अनेक अंगांनी सामुहिक जीवनाचा विकास होतो. संस्कृतीच्या दोन बाजू ढोबळपणे सांगता येतात. एक भौतिक व दुसरी अतिभौतिक. भौतिक म्हणजे जीवाच्या रक्षणाकरता व सोयीकरता ज्या बाह्य जगावर बदल करावे लागतात ती प्रगती होय. उदा. विहीर खोदणे, रस्ता तयार करणे, नदीचे पात्र ओलांडण्याकरता होडी वा नाव तयार करणे वगैरे. अतिभौतिक वा आध्यत्मिक म्हणजे संस्कृतीची मानसिक बाजू होय. भाषा, कला, साहित्य, संगीत, तत्त्वज्ञान, धर्म हे त्या मानसिक संस्कृतीचे काही आविष्कार समजता येतात. माणूस बाह्य विश्वावर व आत्म्यावर विजय मिळवून जीवनात सफल होऊ शकतो. संस्कृती जसजशी विकास पावते तसतशी तिच्यात मूल्ये तयार होता. अशा सामाजिक व नैतिक मुल्यांवर समाज चालत असतो. सामाजिक मुल्ये सर्वकाळी एकसारखी नसतात. त्यात बदल होत रहातो. मूल्ये क्षीण होतात आणि संस्कृतीचा ऱ्हास होतो. अशी उदाहरणे जगाच्या इतिहासात मिळतात. तर्कतीर्थांनी संस्कृतीची उच्च मूल्ये कोणती, कमी प्रतीची कोणती हे सांगितले. ही मूल्ये कायम नसतात तर देशकालानुसार काही वेळा मूल्यांमध्ये फरक पडतो. संस्कृतीला गती असते, तिचा विकास होतो. किंवा ती क्षीणही होऊ शकते. संस्कृतीचा विकास कोणत्या कारणांवर ठरवता येतो याची त्यांनी चर्चा केली आहे.

संस्कृती अनेक प्रकारच्या असतात. कारण प्रत्येक समाज विशिष्ट परिस्थितीत

ती निर्माण करीत असतो. आपण सहजपणे पश्चिमी संस्कृती व पूर्वेकडील देशांची संस्कृती असा उल्लेख करतो. परंतु केवळ पूर्वेकडील देशांच्या, तेथील सामाजिक संस्कृतीत केवढा तरी फरक जाणवतो. उदा. अरबांची व भारताची, भारताची आणि चिनी व जपानी संस्कृतीत त्या त्या संस्कृतीची कितीतरी वैशिष्ट्ये आहेत. संस्कृतीचे हे वेगळेपण तर्कतीर्थांच्या मते, त्यांची भाषा, कपडे, पेहराव, धर्म, ईश्वराची आराधना करण्याची पद्धती, घरेदारे, खाणेपिणे स्त्रियांना वागवण्याच्या पद्धती, उत्पादनाची साधने आणि आर्थिक नियोजन वगैरे कितीतरी बाबतीत असते. हे फरक कशामुळे पडत असावेत? एक तर ज्या भौगोलिक परिस्थितीत समाज जीवन जगतो ती परिस्थिती. उदा. कडाक्याचे थंड हवामान लाभलेले देश आणि रखरखीत वाळवंटी प्रदेश यामधील समाजाच्या जीवनपद्धतीत फरक पडणारच. याशिवाय प्रत्येक समाज विशिष्ट वंशाच्या बीजशक्तीने घडवलेला असतो. तेथील लोकांचे रंगरुप, मानसिक व बौद्धिक गुण व इतर अनेक प्रवृत्ती जी बीजशक्ती ठरविते. सांस्कृतिक विविधतेचे हे एक सरळ साधे स्पष्टीकरण.

तर्कतीर्थांनी संस्कृतीबाबत व्यापक विचार केल्यानंतर ते भारतीय संस्कृतीचा परामर्श घेतात. येथील संस्कृतीचा उल्लेख ते वैदिक संस्कृती असा करतात. वेदपूर्वकालात या ठिकाणी द्राविडी संस्कृती प्रगत स्थितीत होती तरी त्यातील वैशिष्ट्ये वेदानंतरच्या काळाने आत्मसात केलीच, एवढेच नव्हे तर आजपर्यंतच्या येथील समाजावर वैदिक संस्कृतीचाच प्रभाव राहिलेला आहे. या संस्कृतीची पहिली कित्येक शतके ती उज्वल राहिली आणि मध्ययुगातील विसाव्या शतकापर्यंत त्याची लक्षणीय अवलक्षणे दिसू लागली होती. हे राष्ट्र व येथील संस्कृती दुबळी होत गेली याचे सर्वांत महत्त्वाचे कारण म्हणजे दोषपूर्ण अशी येथे निर्माण झालेली समाजव्यवस्था असे त्यांनी दाखवून दिले आहे. येथील मध्ययुगीन समाजाचा विचार करतांना येथील राष्ट्राला परकीयांकडून पुनः पुनः हार खावी लागली. याचे कारण राजकीय सामर्थ्य वाढण्यासाठी सर्व प्रजेचे पाठबळ जरुरीचे असते. तर्कतीर्थांच्या मते येथील जातिव्यवस्थेने विभागला गेलेला समाज एकत्र येणार तरी कसा! सामाजिक बंधुभाव निर्माण व्हावा या दृष्टीने इकडील सामाजिक व धार्मिक निर्बंध मोठी अडचण होऊन बसले होते. जातीय तेढ व मत्सर राजकीय व सामाजिक व्यवहारात वातावरण दूषित करत.

तर्कतीर्थांनी या संदर्भात आणखी एका विशेष वेगळ्या आणि महत्त्वाच्या बाबीकडे लक्ष वेधले. सर्वसामान्य भारतीय मनुष्य जीवनाचा दृष्टिकोन येथे सामाजिक

विकासात मोठा अडसर होऊन बसला होता. हे जग, संसार, बायकामुले, पैसा, व्यवहारातील यश याकडे भारतीय मनुष्य उपेक्षेने बघे. यात काही कमीपणा आहे असे त्याला वाटे. त्याला या जगातील कल्याणापेक्षा स्वर्गमोक्ष, पापपुण्य याची फार फिकीर होती. भारतीय माणसाची या जगापेक्षा परलोकाकडे नजर असे. तर्कतीर्थांनी या वृत्तीवर परखडपणे म्हटले की, ''परंपरेने प्राप्त झालेली परलोकपरायण विचारसरणी जशीच्या तशी स्वीकारून या जगात जगण्याचे सामर्थ्य मिळणार नाही. या जगाचा अर्थ समजला तरच या जगात यशस्वीपणे जगता येते. हे जग अधिक चांगले कसे बनवता येईल हा खरा प्रश्न आहे.''

'वैदिक संस्कृतीच्या विकासात' तर्कतीर्थांनी येथील वेदांसारख्या श्रेष्ठ काव्यप्रतिमेचा, इकडील उत्तमोत्तम तत्त्वज्ञानाच्या परंपरांचा परिचय करून दिला आहे. रामायण, महाभारतासारख्या महाकाव्यावर मनोवेधक माहिती देऊन त्यातील सौंदर्य, मानवीस्वभावाची वैचित्र्ये टिपली आहेत. बौद्ध, जैन दर्शने, भक्तिसंप्रदाय यांची दखल त्यांनी घेतली आहे. २०व्या शतकातील स्वातंत्र्य-आंदोलनातील स्फूर्तिदायक व्यक्ती, त्यांचे प्रेरणादायी तत्त्वज्ञान, शांतता मार्गाने होत असलेले समाजातील अनेकविध योग्य बदल या सर्वांची त्यांनी दखल घेतलेली दिसते. वैचारिक, राजकीय आणि सामाजिक परिवर्तनाचा वेध घेताना आता यापुढील संस्कृती कशा प्रकारची असेल याबद्दल त्यांनी विवेचन केले आहे. हे सर्व स्वातंत्र्याच्या पाठोपाठ येऊ घातलेल्या समाजाचे चित्रण त्यांनी केले आहे. त्याला आता छपन्न वर्षे झाली. तरीही तर्कतीर्थांनी जी अनुमाने काढली ती आजही लागू पडतात. विज्ञान व तंत्रज्ञानातील प्रगती आता अनेक संस्कृतीत शक्य झालेली आहे. त्यामुळे एका अर्थी एक नवी व्यापक जागतिक एकजिनसी संस्कृती निर्माण होण्याची शक्यता त्यांनी वर्तविली होती. त्या विश्वसंस्कृतीत भारतीय संस्कृती देखील भागीदार होणार असल्याचे त्यांनी लक्षात घेतले. या प्रक्रियेत त्या त्या समाजाची सांस्कृतिक वैशिष्ट्ये उरणार नाहीत याचे भय बाळगण्याचे कारण नाही असेही त्यांना वाटले होते, ही आहे संस्कृतीच्या समन्वयाची प्रक्रिया. यात एक धोका नेहमीच संभवतो. तो म्हणजे विज्ञानाच्या एवढ्या प्रगतीमुळे सर्वविनाशाचा धोका.

तर्कतीर्थांच्या संस्कृतीचे मोजमाप कसे करावे यावर खास अशी कल्पना आहे. संस्कृतीचे प्रत्यंतर त्यातील व्यक्तीच्या जीवनात अनुभवास येते. ''संस्कृती म्हणजे विकसित मानव्य होय.'' सांस्कृतिक मूल्याचा खरा अर्थ लक्षात येतो तो त्यातील व्यक्तीचा विकास होतो तेव्हा. अशा विकासास समाजात कोणत्या अडचणी असत

नाहीत तेव्हा. समाजातील सर्व घटकास आपापल्या क्षमतेनुसार काम करण्याची मुभा असते तेव्हा. मनुष्याची शारीरिक, बौद्धिक व मानसिक उन्नती होण्यासाठी योग्य अशी तरतूद असणे हे फार महत्त्वाचे आहे. सर्वांनाच आपल्या आवडीनुसार विद्या, कला, व्यवसाय करण्याचे स्वातंत्र्य असणे हे चांगल्या संस्कृतीचे लक्षण आहे. तर्कतीर्थांनी त्याला उच्च प्रकारचा अध्यात्मवाद म्हटले आहे. धार्मिक अध्यात्मवादाची या देशात, येथील समाजात वर्षानुवर्षे चलती आहे. त्याच्याविषयी बोलणाऱ्यांना अध्यात्माचे रहस्य कळलेच नाही. ''आत्म्याच्या म्हणजे मनुष्याच्या शक्तींचा विकास करणे हाच मानवी जीवनातील अध्यात्मवाद'' असल्याचा आशय, तर्कतीर्थांना वाटले. समाजसंस्थांचे कार्य माणसाचे वैयक्तिक सामर्थ्य वाढविणे असे आहे. कोणतीच मानवी संघटना माणसापेक्षा श्रेष्ठ असू नये.

भारतीय संस्कृतीची समीक्षा करतांना तर्कतीर्थांना येथील प्राचीन समाजावर तात्त्विक विचारसरणीचा कसा प्रभाव होता याचे विवेचन केले आहे. परंतु आता सामाजिक परिस्थितीत फार मोठा फरक पडला आहे. जगातील मोठमोठ्या संस्कृती जवळ येत चालल्या. त्या संस्कृतींमध्ये नेहमीच देवघेव होऊ लागली. पाश्चात्य संस्कृतिला इकडील तत्त्वज्ञान, संगीत, योगविद्या याचे आकर्षण वाटू लागले तरी इकडील समाजाने पाश्चात्यांची अनेक वैशिष्ट्ये उचलली. बौद्धिक व भावनिक पातळीवर संस्कृतीमधून एकमेकांचे चांगले समजून घेण्याचा व तसे करण्याचा प्रयत्न वेगाने चालू आहे. याकरिता पूर्वग्रह बाजूला सारून, सारासार विचाराने नवी तत्त्वदृष्टी या देशास लाभावी असे तर्कतीर्थांना वाटले.

तत्त्वदर्शन म्हणजे केवळ बौद्धिक संपत्ती नव्हे. तर ते जीवनाच्या सर्व भागांवर प्रकाश टाकणारे असावे. त्यामुळे जीवनातील मार्ग शोधताना मदत झाली पाहिजे. ''संस्कृती ही अनुभवांचे आणि विचारांचे संचयस्थान असते.'' त्यामुळे यशस्वीपणे जीवन जगता आले पाहिजे. आध्यात्मिक जीवन याच जगात अनुभवता आले पाहिजे. ते या जगापलिकडे आहे असे समजणे गैर आहे. जगण्याच्या प्रवृत्तीला अधिक जोम देणारा विचार आध्यात्मिक प्रेरणेचा भाग आहे.

तर्कतीर्थांच्या सर्वंकष विचारामुळे त्यांना राष्ट्रीय स्तरावरील महत्त्वाचे पुरस्कार लाभले. त्यातील एक १९७४ मध्ये 'संस्कृत पंडित' म्हणून, दुसरे होते १९७७ मध्ये 'पद्मभूषण'. १९९२ मध्ये तर्कतीर्थांचा 'पद्मविभूषण' या मानचिन्हाने सन्मान करण्यात आला.



# गुरुशिष्य नात्याचा एक आधुनिक आदर्श

तर्कतीर्थ १९४८ च्या जानेवारीच्या शेवटच्या आठवड्यात कलकत्याला होते. तेव्हा बरेचसे रॉयवादी रॉय यांनी योजलेल्या एका व्याख्यानमालेसाठी तेथे जमले होते. अखेरचे भाषण सुधीन दत्तांचे होणार होते, ते ३० जानेवारीला संध्याकाळी ५ वाजता. सभेची सुरुवात होत होती. सुधीन दत्त बोलण्यासाठी उभे राहिले आणि एक बातमी येऊन पोहोचली. ती होती म. गांधींच्या हत्येबद्दल. जमलेले सर्व अवाक् झाले. कोणी त्यावर विश्वास ठेवण्यास तयार नव्हते. तेवढ्यात एम्. एन्. रॉय स्वत: कसेबसे उठले आणि म. गांधींना थोडक्यात श्रद्धांजली अर्पण करून त्यांनी सभा विसर्जित केली. तो काळ म्हणजे संबंध शहरात मोजक्या लोकांकडे रेडिओ असण्याचा. दूरध्वनी असणे हे अगदी क्वचित एखाद्याकडेच शक्य असे. टेलिव्हिजन हा शब्दही फारशा भारतीयांच्या कानी पडला नव्हता. सर्वसाधारण लोक वर्तमानपत्राच्या प्रतिक्षेत असत. विशेष प्रसंगाने मात्र लोक ज्यांच्याकडे रेडिओ असे त्यांच्याकडे बातम्या ऐकण्यास जमत असत. गांधींच्या हत्येचे वृत्त वणव्याप्रमाणे क्षणार्धात जगाच्या कानाकोपऱ्यात पसरले. त्याचबरोबर पुण्यातील एका ब्राह्मण युवकाने त्यांच्यावर गोळ्या झाडल्या हेही एव्हाना कळून चुकले. त्यावर पुढे कोणत्या घटना वाढून ठेवल्या आहेत याची तर्कतीर्थांना कल्पना आली.

तर्कतीर्थांनी त्याच रात्री पुण्याकडे येण्यासाठी रेल्वे स्टेशन गाठले. तब्बल दोन रात्रींच्या प्रवासाने ते पुण्यात आले व पाठोपाठ मिळेल त्या बसने वाईला परतले. प्राज्ञपाठशाळेतील पदाधिकारी आणि त्यांच्या घरातील सर्वजण त्यांची फार वाट पहात होते. कारण गांधी हत्येच्या दुसऱ्याच दिवशी वाई गावातील काही ब्राह्मणांच्या घरांना आगी लावल्या गेल्या. म. गांधी असे अचानक पिस्तुलाच्या गोळ्यांना बळी पडले यावर लोक फार भडकले होते. त्यांच्या दु:खाची प्रतिक्रिया याप्रकारे उमटली होती.तर्कतीर्थ घरी पोहोचल्यानंतर कित्येक आठवडे वाईतील काही घरे धुमसत होती. तर्कतीर्थांनी घरच्या सर्वांना धीर दिला. ते म्हणाले, ''आपल्या घराला काही

होणार नाही. कारण मी मंत्र घातला आहे.' हा कोणता मंत्र होता! वाईच्या परिसरातील सर्व जाणत होते की, महर्षी शिंद्यांना तर्कतीर्थांबद्दल मोठा विश्वास होता. प्राज्ञपाठशाळेच्या कामाची त्यांना कल्पना होती. त्या पाठशाळेत एक दलित विद्यार्थी शिकून बाहेर पडला होता. तो पुढे महाराष्ट्र विधानसभेवर निवडून आला होता. त्याचे नाव होते भिंगारदरे. प्राज्ञपाठशाळेकडे वाईच्या रविवार पेठेतील चौसुपी वाडा द्रविडांनी सुपुर्द केला होता. तो वसतिगृह म्हणून वापरावे असे प्राज्ञपाठशाळेने ठरविले होते. त्यात प्रामुख्याने दलित विद्यार्थी शिकण्यासाठी येऊन रहात. गांधींच्या हत्येनंतर तर्कतीर्थांच्या घरावर आणि प्राज्ञपाठशाळेच्या वास्तूवर एखादा ओरखडा देखील उठला नाही.

तर्कतीर्थांनी गांधी व काँग्रेस पक्ष सोडला होता तो गांधींची काही मते पटली नाहीत म्हणून. तरीही म. गांधींबद्दल त्यांचा आदर जराही कमी झाला नाही. गांधींच्या सत्याग्रहासारख्या नैतिक लढ्याचा त्यांच्या मनावर खोलवर प्रभाव होता. त्यामुळेच त्यांच्या राजकीय जीवनाची सुरवात गांधींच्या सत्याग्रहतंत्राचे सभांमध्ये समर्थन करून झाली होती. त्यांना गांधींना भेटण्याचा योग अनेकवेळा आला होता. गांधीवादापेक्षा मार्क्सच्या तत्वज्ञानाने सामाजिक क्रांति अधिक चांगल्याप्रकारे शक्य होईल या विचारातून तर्कतीर्थांनी गांधीवादाची वाट सोडली. खरे पाहता गांधींच्या नेतृत्वाला लोकप्रियतेचे फार मोठे वलय होते. त्यांच्या तोडीची आंतरराष्ट्रीय स्तरावर मान असलेली दुसरी व्यक्ती सापडणे कठीण होते. तरीही गांधींच्या इतक्या जवळच्या वर्तुळात असण्याची संधी मिळाली असताना तर्कतीर्थांनी त्यांच्यापासून दूर जाण्याचा निर्णय घेतला. त्याचे एकमेव कारण म्हणजे समाजात बदल यावयास हवा या विचारावर ते ठाम होते. तो बदल वैज्ञानिक प्रगतीच्या मार्गावरील ठरावा असे त्यांचे मत होते. गांधीमार्ग त्यादृष्टीने कितपत उपयोगी पडेल याची त्यांना शंका वाटू लागली होती.

तर्कतीर्थांच्या जीवनप्रवासातील टप्पे विलक्षण वाटतात. एका लहानशा गावातील ब्राह्मण कुटुंबातील त्यांचा जन्म. चांगले धर्मसाहित्य वाचलेले आणि उत्तम याज्ञिकी करणारे प्रेमळ संत प्रवृत्तीचे त्यांचे वडील. तरीही त्यांच्या मायेची ऊब व सुरक्षितता तर्कतीर्थांना आपल्या गावात थोपवू शकली नाही. त्यांच्या गावात वर्तमानपत्र येऊन पडणारे उंबरठे अगदी मोजके होते. तरी बाहेरच्या जगात काय चालले आहे आणि आपली त्यात कोणती भूमिका राहील यावर तर्कतीर्थांचा वयाच्या १२/१३ व्या वर्षी निश्चय झाला होता. नित्याच्या वाचनात हरिविजय, पांडवप्रताप, शिवलीलामृत, वगैरे

चाकोरीतील धर्मसाहित्य होते. गांधींचे नाव तेव्हाही त्यांच्या कानावर गेले होते. लहानपणच्या बारीकसारीक घटना कळतनकळत जीवनदृष्टी ठरवत असतात. तर्कतीर्थांच्या बाबतीत असेच काहीतरी घडले. चांगल्या गुरुकुलात शिकण्यासाठी त्यांचे मन फार अधीर झाले होते. हरिद्वारला जाऊन कांगडीच्या गुरुकुलात जाण्यासाठी त्यांचे मन उचल खात होते. तरीही वाईला नारायणशास्त्री मराठे यांच्या पाठशाळेत ते रुजू झाले. नारायणशास्त्रींना सर्वजण ओळखत ते 'स्वामीजी' म्हणून. स्वामींबद्दल म्हणजेच गुरुंबद्दल तर्कतीर्थांना अपार असा कृतज्ञताभाव वाटत असे. कारण तो गुरु फारच वेगळा होता. अगाध अशी त्यांची विद्वत्ता सर्वजण जाणत होते. परंतु त्याबरोबर विनय तितकाच होता. स्वामींचे जीवन स्वच्छ अशा बिलोरी आरशाप्रमाणे होते. त्यांची स्वत:ची शिस्त होती. विद्यार्थ्यांमध्ये शिस्त कशी उतरेल याबाबत ते दक्ष होते. अतिशय त्यागपूर्ण जीवन असतानाही स्वामींमध्ये भारतीय संस्कृतीला नव्या संजीवनीची जरुरी असल्याची जाणीव होती. त्यानी आधुनिकतेचा अर्थ चांगल्याप्रकारे जाणला होता. असा गुरु तर्कतीर्थांना न भेटता तर तर्कतीर्थही याप्रकारे घडले नसते. गुरुशिष्याचे ते नाते आधुनिक काळात अगदी अपवादानेच आढळेल. स्वामींना ७५ वर्षे पूर्ण होताना प्राज्ञपाठशाळेने एका भव्य कार्यक्रमाची आखणी केली होती. त्याप्रमाणे स्वामींवर एक अभिनंदन ग्रंथ तयार केला होता. त्यात विविध विषयांवर भारतातील विद्वान मंडळींनी लेख लिहिले होते. हा ग्रंथ तेव्हाचे न्या. मू. प्रल्हादाचार्य गजेंद्रगडकर यांच्या हातातून स्वामींना एका भव्य समारंभात देण्यात आला. तो सोहळा अतिशय नेत्रदीपक होता. वाईच्या गंगापुरीच्या घाटावर उभारलेल्या प्रशस्त मंडपात शेकडो विद्वान, साहित्यिक आणि राजकीय महत्वाच्या व्यक्ती त्यासाठी आल्या होत्या. स्वामी या सोहळ्यात कृतज्ञतेखाली विनम्र होते.

त्या अभिनंदनग्रंथात तर्कतीर्थानी आपल्या गुरुंच्या जीवनाचा आणि कार्याचा आलेख दिला आहे. तो काळजाला भिडतो. तर्कतीर्थांच्या भाषेत त्यांचे गुरु हे प्राचीन आचार्यांचा आदर्श होते. मातापित्याच्या वंशाइतकेच किंबहुना त्यापेक्षा अधिक आचार्यवंशांचे महत्व असते. माणसात न्यायबुद्धी वसत असते. तिला बाहेर येण्यास गुरुची मदत होते. गुरु वा आचार्य ज्ञानाव्यतिरिक्त आपल्या शिष्यांमध्ये माणूस म्हणून जगण्याची मूल्ये जोपासतो. मातापित्याकडून शरीर मिळते परंतु सुसंस्कृत आणि लायक व्यक्ती म्हणून जगता येते ते गुरुने केलेल्या संस्कारामुळेच.

स्वामी आणि तर्कतीर्थ हा शिष्य, यांच्यातील एक उदात्त आणि पवित्र नाते त्या दीर्घ लेखातून प्रकट होत जाते. उंचेपुरे, निरोगी, गंभीर आणि प्रसन्न स्वामींचा त्यांनी

रोजचा कार्यक्रम त्यात सांगितला आहे. सकाळी ७ वाजल्यापासून ते पाठ देत. जसे प्रौढ विद्यार्थ्यांना शिकवत तसेच नव्याने प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांस देखील. प्राज्ञमठात स्वामींनी ४० वर्षे शिकविल्याचे त्यांनी म्हटले. कृष्णाकाठच्या गंगापुरीच्या घाटावरील एका मठीत या संन्यासाचे रहाणे होते. जवळ अभ्यासाचे नीट मांडलेले ग्रंथ, नेसूचे वस्त्र आणि दोरीवर वाळत असलेली भगवी वस्त्रे, मधुकरीसाठी गेल्यावर लागणारे ताट, तांब्या आणि फुलपात्र म्हणजेच भिक्षापात्रे या पलिकडे स्वामिनी कशाचाच संग्रह केला नाही. त्यांना व्यायामाची शिस्त होती. इतरांबरोबर गप्पा छाटत बसले असे कधीही घडले नाही. स्वत:चे काम ते स्वत: करीत. शिष्य उत्साहाने त्यांची कामे करण्यास पुढे येत पण ती मदत ते किंचित स्मित करून नाकारत असत. शिकावयास येणाऱ्या विद्यार्थ्यांचे रहाणे तेथेच असल्यामुळे त्यांची संपूर्ण जबाबदारी स्वामींनी उचलली. विद्यार्थ्यांच्या चारित्र्याची घडण होईल यावर स्वामींचे लक्ष असे.

तर्कतीर्थांचे गुरु अगदी नि:स्पृह आणि निर्वैर. तत्कालीन वा आधी होऊन गेलेल्या साधुसंतांपेक्षा त्यांच्या मनोवृत्ती कितीतरी वेगळ्या आणि विचाराला पटणाऱ्या होत्या. उपासतापास करून शरीराला कष्ट देणे त्यांना कधी योग्य वाटले नाही. शरीर निरोगी राखून काही ध्येये साध्य करण्यासाठी सकस आणि नियमित आहार घेतला पाहिजे असे त्यांचे मत होते. एकचित्त करून ते काहीवेळ ध्यानधारणा करीत परंतु, भक्तिगीते गात. भजन करीत त्यांनी धार्मिक उपासना केली नाही. त्यांचे म्हणणे होते त्यामुळे उगीच भक्तगण गोळा होतात व तोच प्रतिष्ठेचा मुद्दा होतो. त्या प्रतिष्ठेच्या प्रेमात लोक पडतात आणि ईश्वराची आराधना मागे पडते. जमा होत गेलेल्या लोकांना खूष करण्यासाठी जरूर नसलेल्या गोष्टींच्या मागे लागावे लागते. भक्तिभावाचा तो फक्त बाजार ठरतो. खरी भक्ती मनात रहाते. तिचे प्रदर्शन करण्याची गरज उरत नाही. त्यांच्या गुरुंच्या धार्मिक जीवनात भजन व कीर्तन याला जागा नव्हती.

तर्कतीर्थांच्या मते, आपल्या गुरूंची वैशिष्ट्ये होती. त्यांनी धार्मिकता आणि राष्ट्रीयत्व यांचा जो मेळ घातला तो अतिशय आगळ्यावेगळ्या पद्धतीचा. स्वामींच्या देखरेखीखाली प्राज्ञपाठशाळा ही धार्मिक व सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करणारे केंद्र बनली. तेथे असलेल्या काही प्रौढ विद्यार्थ्यांकडे चांगली पिस्तुले देखील होती. स्वामींपासून लपवून ती आणली गेली नव्हती. देशाच्या स्वातंत्र्यासाठी असणाऱ्या जहाल विद्यार्थ्यांना त्यांची मूक संमती होती. त्यांच्या गुरुने आध्यात्मिक साधनेत जीवन घालवून देखील सामाजिक ऋण फेडलेच. तर्कतीर्थांनी त्यांच्याबद्दल असेही म्हटले होते की, प्राचीन भारतीय शिक्षण पद्धतीत विद्यार्थ्यांकडून मूल्य घेतले जात नसे.

आचार्य आणि गुरु कधी कोणावर आर्थिक बाबतीत अवलंबत नसत. त्यामुळे अशा शिक्षक वर्गाला कधी मिंधेपण स्वीकारावे लागले नाही. नव्या जगात शुद्ध बुद्धीने शिष्य तयार करण्यात सगळे जीवन घालवणारे स्वामी या दृष्टीने कदाचित अखेरचे आचार्य असतील. पण असे आचार्य, जे प्राचीन आचार्य संस्थेचे प्रतीक होते ते तर्कतीर्थांना लाभले होते. त्यांच्या काही बैठकीत लोक तर्कतीर्थांना विचारत ''शास्त्रीबुवा, तुम्ही शिष्यपरंपरा कशी काय तयार केली नाही? ते त्यावर फक्त किंचित स्मित करीत. त्या प्रश्नांचा पाठपुरावा पुन: पुन: केला गेल्यास ते म्हणत ''माझ्याकडे खरेच याचे उत्तर नाही.'' शिष्याची शिकण्याची तयारी असावी लागते. मनापासून नि:शंकपणे गुरुवर विश्वास असावा लागतो. गुरुच्या ज्ञानाबद्दल आणि चारित्र्याबद्दल आदर हवा. तेव्हां कोठे गुरुशिष्य संबंधाला पवित्रतेचा स्पर्श होतो.

प्रत्येक विचार परंपरेतील असो वा नसो, तो पारखून घ्यावयास हवा. ही विचारसरणी तर्कतीर्थांना स्वामींकडून मिळाली. शिवाय स्वामींच्या वैयक्तिक जीवनाचा तर्कतीर्थांवर स्पष्ट ठसा होता.त्यामुळे त्यांचा सामाजिक जीवनाशी ताल चांगल्याप्रकारे जुळला. तर्कतीर्थ खासगी वैयक्तिक जीवनात अडकून पडले नाहीत. तरीही ते संस्थात्मक कार्याच्या निमित्ताने निरंतर फिरताना घरचा वेध घेण्यास कधी चुकले नाहीत. त्यांच्या जीवनाकडे पहाताना मंगेश पाडगावकरांच्या कवितेच्या ओळी पुन: पुन: आठवतात. पाडगावकरांच्या त्या काव्यपंक्ती अशा आहेत-

जगण्याची ओढ अशी
उडण्याचे वेड असे
घरट्याच्या लोभातही
गगनाचे भव्य पिसे
व्योमातून उडताना
ओढितसे मज घरटे
अन् उबेत घरट्याच्या
क्षुद्र तेज गमते.

स्वामी १९५५ मध्ये निधन पावले. तेव्हां संन्याशासाठी जो अंत्यविधी असतो त्याच पद्धतीने हजारोंच्या उपस्थितीत तर्कतीर्थांनी आपल्या गुरुला अखेरचा निरोप दिला. पुढे ३/४ वर्षातच गुरुंच्या समाधीच्या जागी त्यांचे स्मृतिमंदिर बांधण्यात आले. स्वामींचे खरेखुरे स्मारक म्हणजे धर्मकोश.त्यांच्या सल्ल्याने सुरु झालेल्या या कोशाचे काम पूर्ण झाले नाही. त्याचे २० खंड प्रसिद्ध झाले परंतु तो अपुरा राहीला. त्यासाठी पैशाचे

पाठबळ कमी पडत होते. एका काळी घन:श्यामदास बिर्लांनी सर्व आर्थिक बळ, कोशाच्या कामासाठी इमारतीसह देण्याची तयारी दाखवली. त्यांची एकच अट होती ती म्हणजे धर्मकोशाचे सर्व काम, त्यात काम करणारे शास्त्रीपंडित आणि अर्थात प्रमुख संपादक म्हणजे तर्कतीर्थ देखील, यांनी दिल्लीत येण्याची तयारी करावी. ही अट मान्य करण्यामुळे प्राज्ञपाठशाळेच्या त्या प्रकल्पाला स्वत:ची ओळख पुसावी लागणार होती. स्वामी आणि प्राज्ञपाठशाळा हे समीकरण होऊन बसले होते. त्यामुळे बिर्लांनी सुचवलेली तडजोड मान्य झाली नाही. या मागील २५ वर्षांत या प्रकल्पाच्या दृष्टीने एक नवी अडचण पुढे आली. संस्कृत पाठशाळा बंद होत गेल्या कारण त्या तऱ्हेच्या अभ्यासक्रमाकडे फारसे कोणी वळेना. दक्षिणेकडे व बनारसकडे ज्या पाठशाळा काही तग धरून आहेत त्यातील चांगले शास्त्री धर्मकोशाचे काम करण्यासाठी तयार होईनात कारण त्यांना फार आकर्षक वेतन देता येत नव्हते. तर्कतीर्थांना त्यांच्या अखेरच्या दिवसात एकच खंत होती. ती म्हणजे स्वामींचे कार्य अपुरे राहिले. गुरुच्या ऋणातून आपल्याला मुक्त होता आले नाही ही जाणीव.

साधारण १९५० पासून प्राज्ञपाठशाळेतील ४/५ दशके चालत असलेल्या अभ्यासक्रमाकडे विद्यार्थ्यांचा ओढा कमी झाला. तेथील अध्यापनाचे काम हळुहळु बंद होत चालले. प्राज्ञपाठशाळेला काही नव्या योजनेची आवश्यकता वाटत होती. वाई हे तालुक्याचे गाव. शेती व्यापार वाढीस लागला होता आणि तेथील लोकसंख्या वाढत होती. त्या ठिकाणी चांगली हायस्कूले होती पण पुढील शिक्षणासाठी वाईतून बाहेर पडावे लागे. कारण तेथे महाविद्यालय नव्हते. तर्कतीर्थांनी महाविद्यालय सुरु करण्याची तयारी चालू केली. त्यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळातर्फे पुणे विद्यापीठाकडे तसा अर्ज केला. महाविद्यालय चालू करण्यासाठी काही मूलभूत गोष्टी मंडळाकडे असाव्या लागतात. उदा. विस्तृत जागा, ग्रंथालय, आर्थिक तरतूद वगैरे. त्याच सुमारास विवेकानंद सोसायटीच्या श्री. साळुंख्यांनी देखील वाईत महाविद्यालय चालवण्यासाठी परवानगी मागितली होती. पुणे विद्यापीठाची चौकशी समिती सर्व गोष्टींची शहानिशा करण्यासाठी येऊन गेली. त्या समितीने प्राज्ञपाठशाळा मंडळाची सर्व अटी पूर्ण करण्याची क्षमता असल्याचा निर्णय दिला. श्री. साळुंखे फार खट्टू झाले. यशवंतराव चव्हाणांना तर्कतीर्थांची योजना फार आवडली. १९६२ मध्ये पुण्यात २/४ दिवस मुलाखती घेऊन प्राध्यापक वर्ग, प्राचार्य वगैरेबाबत सर्व नक्की ठरले. तत्पूर्वी विद्यापीठाची परवानगी मिळाल्यावर कऱ्हाडचे इंजिनियर श्री. कोटणीस यांना महाविद्यालयाची इमारत बांधण्यास सांगण्यात आले होते. ठरल्याप्रमाणे जून २० ला

(१९६२) वाईचे प्राज्ञपाठशाळा मंडळाचे कला व वाणिज्य महाविद्यालय सुरू झाले.

त्यासाठी महाराष्ट्र बँकेचे कर्ज मिळाले होते. पण १/२ वर्षात कर्जाचे हप्ते फेडण्यास वेळ लागू लागला. तर्कतीर्थांनी संस्थेला काही देणग्या मिळाव्यात म्हणून प्रतिष्ठित आणि संपन्न लोकांच्या भेटी घेतल्या. स. का. पाटील हे मुंबईप्रदेश काँग्रेसचे अध्यक्ष आणि राजकारणी व उद्योजकांमध्ये त्यांचे मोठे वजन होते. तर्कतीर्थ, स. का. पाटील, शांतिप्रसाद जैन, बलदोटा बंधू यांना न. र. फाटकांना बरोबर घेऊन भेटले. तेव्हांचे शिक्षणमंत्री स. गो. बर्वे यांच्याकडे अनुदानाच्या भरीव रकमेसाठी त्यांनी अर्ज केला. स्वत: यशवंतराव, महाराष्ट्राचे मुख्यमंत्री ना. कन्नमवार, केंद्रीय शिक्षणमंत्री हुमायून कबीर महाविद्यालयाला भेट देऊन गेले. आश्वासने मिळाली पण पैसे पाठविले गेले नाहीत. कोरड्या भावना, कौतुकाचे चार शब्द पदरी पडले एवढेच. बलदोटा बंधुंनी रु. ५००० देऊ केल्यावर तर्कतीर्थ त्यांना नमस्कार करून बाहेर पडले. त्याचवेळी तेव्हांचे प्राचार्य भास्करराव पाटील यांनीही आतून राजकारण खेळण्यास सुरुवात केली होती. त्यामुळे प्रा. पा. शा. मंडळाने ५ वर्षे चालवलेले महाविद्यालय शेवटी जनता शिक्षण संस्थेकडे गेले आणि 'किसन वीर महाविद्यालय' म्हणून चालू राहिले. आज ते महाविद्यालय शिवाजी विद्यापीठाच्या कक्षेत येते. त्यात आता विज्ञानशाखेची भर पडली आहे. वाई तालुक्यातील शेकडो विद्यार्थी विद्यार्थिनी तेथे शिकत असतात. भारतीय समाजातील जे महत्त्वाचे प्रश्न आहेत त्यावर एक इलाज म्हणजे शिक्षण. त्यासाठी वाई तालुक्याच्या गावात जे करणे शक्य होते ते तर्कतीर्थांनी केले खरे. शिक्षणाचा हा उपक्रम हातातून निसटला पण त्याची खंत त्यांनी केली नाही. किसनवीर हे एक स्वातंत्र्यसैनिक. त्यांची ऊठबस तर्कतीर्थांच्या घरी होतीच. त्यामुळे महाविद्यालयाचे नाव बदलले तरी ज्ञानवितरणाचे काम चालू राहिले.

तर्कतीर्थ हे आधुनिक युगातील विचारवंत. त्यांच्या वैचारिक बैठकीमुळे सामाजिक प्रश्नांकडे पहाण्याची त्यांची दृष्टी मौलिक असे. आज जेव्हां हिंदू धर्माच्या नावावर हवी ती भूमिका घेऊन वाद उत्पन्न होतात तेव्हां धर्म चांगल्याप्रकारे समजाऊन देणाऱ्या त्यांच्यासारख्या जाणकाराची गरज असते. असे कोणी आज तरी नजरेसमोर येत नाहीत. हिंदू धर्मशास्त्रांच्या सखोल अभ्यासाची त्यांना सामाजिक प्रश्नावर विचार करण्यात फार मदत झाली. आधुनिक नवमानवतावादी दृष्टिकोनातून देखील धर्म कोणत्या ना कोणत्या स्वरुपात समाजमानसावर स्वार होऊन रहातो हे त्यांनी लक्षात घेतले. नवमानवतावादामुळे त्यांना विशाल दृष्टिकोन मिळाला. त्यामुळे मानवसंबंधित सर्वच प्रश्नांबद्दल त्यांना आस्था होती. माणसामाणसाला जोडणाऱ्या सेतूंच्या ते

शोधात राहिले. समाजातील अनिष्ट प्रथांशी संघर्ष करतांना चांगल्या प्रवृत्ती कशा वाढतील यावर ते विचार करीत. मानवी हक्क आणि स्वातंत्र्य जपले पाहिजे म्हणून त्यांचे अथक प्रयत्न होते. समाजाची विवेकबुद्धी होऊन ते वावरले.

तर्कतीर्थांचे जीवन कृष्णेच्या प्रवाहाशी जोडले गेले होते. नदीच्या प्रवाहीपणाचे, तिच्या तरल दर्शनाचे त्यांचे कौतुक कधी कमी झाले नाही. अनेक प्रतिभावंतांना स्फूर्ती मिळाली ती संथपणे वाहत रहाणाऱ्या नदीच्या किनारी बसून. नदी वहात रहाते, पाण्याचे नवे पाट तिच्या प्रवाहात येऊन मिळत असतात तरी नदीचा मूळ परिचय तसाच रहातो. तर्कतीर्थ जगले ते कृष्णाकाठी. त्यांचे जीवन संपले ते कृष्णा नदीच्या उगमाच्या अगदी नजिक, महाबळेश्वरला. तेव्हां त्यांचे ९४वे वर्ष चालू होते. २७ मे, १९९४ रोजी विनासायास कोणतीही पूर्वसूचना न देता ते काळाच्या आधीन झाले. संस्कृती व धर्माचा मर्मज्ञ एवढीच त्यांची ओळख पुरेशी होत नाही. त्यांच्या जीवनाचा आणि कर्तृत्वाचा पट त्यापेक्षा बराच विस्तृत आहे.



# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

## :: नवीन प्रकाशने ::

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मराठी वाङ्मयकोश खंड ४ (समीक्षा-संज्ञा) | समन्वयक संपादक डॉ. विजया राजाध्यक्ष | रु. ३२०/- |
| २) | दादासाहेब गायकवाड काल आणि कर्तृत्व | संपादक मंडळ | रु. ६०/- |
| ३) | पं. जवाहरलाल नेहरू व्यक्ती आणि कार्य | संपादक प्रा. बा. ह. कल्याणकर | रु. १४०/- |
| ४) | भारताचा स्वातंत्र्यलढा | डॉ. वा. ना. कुबेर | रु. १०९/- |
| ५) | मध्ययुगीन महाराष्ट्र | प्रा. म. श्री. माटे | रु. ७५/- |
| ६) | भारतातील आदिवासी वंश | प्रा. वि. श्री. कुलकर्णी | रु. १२५/- |
| ७) | खानदेशातील कृषक जीवन | डॉ. रमेश सूर्यवंशी | रु. ६०/- |
| ८) | चरियापिटक | डॉ. शेषराव मेश्राम | रु. ३३/- |
| ९) | चिरकालिन सिरॅमिक्स | डॉ. प्रकाश दळवी | रु. ४५/- |
| १०) | छत्रपती शिवाजी महाराज | डॉ. प्र. न. देशपांडे | रु. ४८/- |
| ११) | सर्वज्ञ चक्रधर | प्रा. पुरुषोत्तम नागपुरे | रु. ३७/- |
| १२) | संत जनाबाई | डॉ. सुहासिनी इर्लेकर | रु. ५०/- |

## महाराष्ट्राचे शिल्पकार योजनेअंतर्गत चरित्रग्रंथ मालिकेतील चरित्रग्रंथ

| | | | |
|---|---|---|---|
| १) | कर्मवीर मामासाहेब जगदाळे | व. न. इंगळे | रु. ४५/- |
| २) | तंट्या भिल्ल | बाबा भांड | रु. ४५/- |
| ३) | यशवंतराव चव्हाण | विठ्ठलराव पाटील | रु. ४०/- |
| ४) | दादासाहेब फाळके | बापू वाटवे | रु. ४०/- |
| ५) | तेजस्विनी अहिल्याबाई होळकर | विजया जहागीरदार | रु. ४५/- |
| ६) | ताराबाई शिंदे | इंद्रजित भालेराव | रु. २५/- |

***मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाण***

सर्व शासकीय ग्रंथ भांडार
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद व
महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते

***अधिक माहिती/चौकशीसाठी***

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
तिसरा मजला, दादर (पूर्व),
मुंबई-४०० ०१४.
दूरध्वनी - २४१४४९२१, २४१४६००५



अरुंधती खंडकर म्हणजे पूर्वाश्रमीच्या सुमन लक्ष्मण जोशी. वाई येथे शालेय शिक्षण त्यांनी संपवले. एस्.एस्.सी. नंतर पुढील शिक्षणासाठी त्या पुणे येथील सर परशुराम भाऊ कॉलेजमध्ये १९५० मध्ये आल्या. त्यांनी १९५४ मध्ये तत्त्वज्ञान विषयात बी.ए. ऑनर्स पदवी घेतली. पाठोपाठ पुणे विद्यापीठातून तत्त्वज्ञान व समाजशास्त्र या विषयात त्यांनी एम्.ए. केले.

अरुंधतीबाई विवाहानंतर मुंबईत आल्या. शीव येथील नव्याने सुरू झालेल्या एस्.आय्.इ.एस. या महाविद्यालयात त्या तत्त्वज्ञान विभागात लेक्चरर् म्हणून रुजू झाल्या. १९६० मध्ये, त्यानंतर १९७५ पासून त्या विभागप्रमुख राहिल्या. मुंबई विद्यापीठात तेव्हापासून त्या पदव्युत्तर वर्गांना अर्वाचीन पाश्चात्य तत्त्वज्ञान शिकवत होत्या. मुंबई विद्यापीठात ॲकॅडमिक कौंसिल व नंतर एक्झिक्युटिव्ह कौंसिलच्या सदस्य या नात्याने त्यांनी अनेक महाविद्यालयांच्या प्रश्नात लक्ष घातले. काही महाविद्यालयांना आवश्यक सुधारणा करण्यासही त्यांनी भाग पाडले. त्या १९९२ मध्ये उपप्राचार्य म्हणून सदर महाविद्यालयातून निवृत्त झाल्या.

अरुंधतीबाईंनी निवृत्तीनंतर एका वर्षात हिंदुधर्मावरील आपला प्रबंध पुरा करून त्यावर ''डॉक्टरेट'' मिळविली.

अरुंधतीबाईंनी मॅकियावेलीच्या 'प्रिन्स' या राजकारणावरील अव्वल समजल्या गेलेल्या पुस्तकाचा अनुवाद केला, 'राजा' या नावाचा. साहित्य अकादमी, नवी दिल्लीने तो १९६३ मध्ये प्रकाशित केला. त्यांनी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्रींवर चरित्रग्रंथ लिहिला १९९५, त्या ग्रंथाला महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळाचा पुरस्कार लाभला. 'आद्य शंकराचार्यावर एक संपादित पुस्तक १९९७' आणि 'सूर्य पाहिलेली माणसं' २००१. अशी आणखी दोन पुस्तके त्यांच्या नावावर आहेत.

विद्याविहार येथील 'भारतीय संस्कृति पीठम्' यांनी चालविलेल्या काही शैक्षणिक कार्यक्रमात त्यांनी तीन वर्षे शिकविले आहे. वाचन आणि लिखाणात त्या अजूनही रंगतात.